

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)






महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
   वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

## अनुक्रमणिका



---

**प्रकाशन :** त्रैमासिक (जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर)

**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके :** मृणालिनी शहा, १, शीतल अपार्टमेंट, ४६/४, एरंडवणे, पुणे ४११ ००४. दू. क्र. ५४३३८६९
pravinshah@ip.eth.net

**व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा :** नीलिमा गुंडी, ३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५, वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११ ००२. दू. क्र. ४४८६०१५
**पत्रिकेची वर्गणी, जाहिरातीचे दर :** आवरणपृष्ठ तीन पहा.


या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अंशतः अनुदान मिळालेले आहे. तसेच मैसूर येथील भारतीय भाषासंस्थान यांचेही अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्यशासन आणि भारतीय भाषासंस्थान सहमत असेलच असे नाही.

---

**संपादक :** मृणालिनी शहा.
**प्रकाशक व मुद्रक :** मराठी अभ्यास परिषदेसाठी नीलिमा गुंडी
**मुद्रण स्थळ :** पद्मरेखा आर्ट्स, १९४/२, नवी पेठ, पुणे ४११ ०३०.

**संपादकीय**

# यथा भाषकस्तथा भाषा

"......... 'यथा राजा तथा प्रजा; यथा गुरूस्तथा शिष्यः' याप्रमाणेच 'यथा भाषकस्तथा भाषा' असेही म्हणता येईल." हे वाक्य आहे, रेव्हरंड जोसेफ वान सोमरन टेलर यांचे. आजच्या आपल्या भाषिक गोंधळाच्या परिस्थितीला लागू पडणारे हे वचन आहे - १८६७ सालच्या गुजराती भाषेच्या संदर्भातले. ब्रिटिश राजवटीत इंग्रजी शिक्षण सुरू झाले त्या काळातले, इंग्रजीतील ज्ञान गुजरातींत आणण्यासाठी भाषांतराचे काम सुरू झाले त्यावेळचे, आणि मुख्य म्हणजे इंग्रजी - गुजराती असे भाषांतर करत असताना गुजराती भाषा अपुरी पडते आहे अशा चर्चेतले, 'गुजराती भाषानु व्याकरण' या पुस्तकाच्या प्रस्तावनेतले हे वाक्य आहे. भाषांतरासाठी गुजराती भाषा अपुरी पडत नाही तर कमी पडत आहे ते गुजराती भाषकांचे ज्ञानप्राप्तीचे आणि भाषांतरकर्मांचे प्रयत्न, असे मूलभूत विचार मांडत असताना रेव्हरंड जोसेफ यांनी ही भाषिक कोटी केली आहे. ते पुढे म्हणतात की, भाषा ही माणसाच्या बुद्धीच्या आश्रयाने बोलली जाते त्यामुळे जेव्हा बुद्धी कमी पडते तेव्हा भाषाही कमी पडते. त्यामुळे भाषेला दोष देण्यापेक्षा माणसाने आपला अभ्यास वाढवला पाहिजे, त्याप्रकारचे भाषिक अनुभव व्यक्त करणारे मातृभाषेतले शब्द शोधण्याचे प्रयत्न केले पाहिजेत. गुजरातीची भलावण करत असताना, परिभाषेच्या आणि भाषांतराच्या संदर्भातील त्यांच्या या शंभरसव्वाशे वर्षांपूर्वीच्या उक्तीची आठवण झाली ती मराठीच्या बाबतीत.

या आठवणीचे निमित्त होते शास्त्रीय संगीतासाठी दिल्या जाणाऱ्या एका प्रतिष्ठित पुरस्कार वितरण समारंभाच्या पुण्यातील प्रसंगाचे. मात्र प्रथमच एक गोष्ट स्पष्ट केली पाहिजे ती अशी की, गुजराती भाषेसंबंधी रेव्हरंड जोसेफ यांनी सांगितलेला संदर्भ येथे अपेक्षित नसून "जसा बोलणारा तशी त्याची बोली" असा साधा सरळ अर्थ येथे लक्षात घेतला आहे. आपल्याला ठाऊकच आहे की, शास्त्रीय संगीताच्या कार्यक्रमांची एक दीर्घ परंपरा पुणे शहराला आहे. पुणेकर वक्त्यांची आणि जाणकार श्रोत्यांची ख्याती भारतभर पसरलेली आहे. त्याचप्रमाणे ब्रिटिश काळापासून औपचारिक लेखन-वाचनासाठी पुण्याची मराठी भाषा प्रमाण मानली जाते. संगीत क्षेत्रातील गायन-वादन या कलांच्या शास्त्रीय विवेचनासाठीची,

आस्वादप्रक्रियेसाठीची पारिभाषिक मराठी घडवण्यात पुणेकरांचा मोठा वाटा आहे. आता या पार्श्वभूमीवर पुढील प्रसंग पाहिला की "यथा भाषकस्तथा भाषा" या उक्तीची आठवण का झाली, याचा उलगडा होईल.

भारतीय पातळीवरच्या सुप्रसिद्ध वादकाला शास्त्रीयसंगीताचा पुरस्कार देण्याचा तो कार्यक्रम होता. महाराष्ट्रातील नामवंत, दिग्गज, पुण्यातील प्रतिष्ठित नागरिक आणि रसिक - श्रोते यावेळी उपस्थित होते. कोणताही पुरस्कार देताना पुरस्कारप्राप्त व्यक्तीची-कलाकाराची ओळख करून देणे हा अशा औपचारिक प्रसंगातील एक शिष्टाचार असतो, हे सांगायला नकोच. तर अशा या सुनियोजित कार्यक्रमात अमराठी कलाकाराची ओळख करून देणाऱ्या बाईंची भाषा कोणीही मराठी भाषक अस्वस्थ होईल अशी होती. हिंदी, इंग्रजी आणि मराठी अशा तीन भाषांमधील वाक्यांची सरमिसळ त्यांनी केली होती. का तर म्हणे हा "फ्युजन"चा जमाना आहे. आणि दुसरे म्हणणे असे की, भारतीय आणि पाश्चात्य वाद्यसंगीताचा उत्कृष्ट मिलाफ करणाऱ्या "फ्युजन" या कार्यक्रमाच्या जडणघडणीत त्या कलाकाराचा फार मोठा सहभाग होता. म्हणून या बाईंनीही भाषेचे "फ्युजन" केले होते. त्याची थोडीशी झलक पाहूयात "नाऊ वुई आर इंन्ट्रोड्युसिंग टू यू.... पुरस्कार विजेते..... यांची ओळख करून देताना मला पुराणातील एक गोष्ट आठवते आहे...... तो ऐसे बडे कलाकार आज अपने बीच है ये अपना सौभाग्य है....... नाऊ आय ॲम रिक्वेस्टिंग टू..... ही संधी त्यांनी आम्हाला दिली याबद्दल मी त्यांची ऋणी आहे......" इत्यादी. तर अशा या भाषेच्या भेळमिसळीच्या "फ्युजन"मध्ये आणि संगीताच्या कार्यक्रमातील "फ्युजन"मध्ये जमीनअस्मानाचा फरक आहे, हे कोणाच्याही लक्षात येईल. त्या बाईंच्याच भाषेत बोलायचे तर "भाषिक फ्युजन"बद्दल आणि भाषेबद्दलच त्यांच्या मनात "कन्फ्युजन" आहे. औपचारिक प्रसंगातील भाषेत नको एवढी अनौपचारिकता आणण्याच्या नादात, व्यक्तिमत्वातील अत्याधुनिकता दाखवण्याच्या प्रयत्नात आणि रेडिओ मिरचीच्या भाषेचे अनुकरण करण्यात त्या कार्यक्रमाचे गांभीर्यच त्यांनी कमी केले. त्या पुरस्काराच्या प्रतिष्ठेलाही कुठेतरी गालबोट लागले, असे म्हटले तर अतिशयोक्ती होणार नाही. हवेच्या प्रदूषणात अग्रेसर ठरलेले पुणे शहर आता भाषेच्या प्रदूषणातही अग्रेसर ठरणार की काय अशी शंका तुमच्या माझ्यासारख्या भाषाप्रेमींच्या मनात आली तर नवल नाही.

■

**मृणालिनी शहा**



अनुक्रमणिका







# मराठीला वाचवायचं? आणि ते का बरं?

**अशोक रा. केळकर**

'मराठी भाषेला वाचवा!' अशा प्रकारची हाकाटी हल्ली केली जात आहे. या हाकाटीतलं आवाहन जसं सामाजिक-सांस्कृतिक-राजकीय नेतृत्वाला केलेलं असतं तसंच ते थेट लोकांनाही केलेलं असतं. त्यापुढे जाऊन, मराठी भाषा कशी वाचवायची याबद्दल लोकजागृती करणं, काही धोरण स्वीकारणं, आणि निरनिराळे नियम बांधणं अशाप्रकारचे कार्यक्रम आखले जातात. मराठी भाषा कशापासून वाचवायची याही प्रश्नाची विविध उत्तरं दिली जातात-इंग्रजीच्या किंवा हिंदीच्या आक्रमणापासून वाचवायची, अरबी-फार्सीच्या प्रभावापासून भाषा शुद्ध करायची, अगदी संस्कृत भाषेच्या अतिरेकी प्रभावापासून तिला वाचवायची अशी काही उत्तरं मिळत असतात. मराठी-भाषकांना कोणत्या न्यूनगंडानं पछाडलं आहे याची चिंता केली जाते. पण सगळ्यात महत्त्वाचा प्रश्न मात्र विचारला जात नाही आणि मग साहजिक तो प्रश्न अनुत्तरित राहतो. असं जरी असलं तरी माझ्या अटकळीनुसार तो परखड प्रश्न आजच्या तरूण पिढीच्या मनात रेंगाळत असतो, आणि तो म्हणजे -मराठी भाषेला वाचवायचं तरी का? काय बिघडणार आहे ती वाचली नाही तर? पण या अनुत्तरित प्रश्नाची चाहूल लागून भयभीत झालेली काही मंडळी मग मनाला दिलासा देत राहतात-कसली काळजी करताय मराठी भाषेची? ही एवढी प्रजा खेड्यांतून, शहरातल्या गल्लीवस्त्यांमधून पसरलेली आहे ती काय उद्या इंग्रजीत वा हिंदीत बोलायला लागणार आहे थोडीच? काही मरत नाही आपली मराठी!

कळीचा प्रश्न आहे तो म्हणजे मराठी भाषेनं कोणत्या पातळीवर जिवंत रहायचं? आज मराठी भारतामधल्या डझन दीडडझन विकसित भाषांपैकी एक समजली जाते, उद्या ती भारतातल्या शेकड्यांनी मोजता येतील अशा अविकसित भाषांपैकी एक मानली जाऊ लागली तर कसं? तर ती वाचली ना आपोआप असं म्हणून समाधान मानायचं? 'मराठीला वाचवा' असं केवळ तोंडदेखलं आवाहन करणाऱ्या मंडळींचं त्यात समाधान होईलही! पण जे असं आवाहन कळकळीनं करीत आहेत ते यात समाधान कसं मानतील? माणसाच्या जगण्याबद्दल विचार

करताना आपण जीवनाच्या गुणवत्तेचा, 'क्वॉलिटी ऑव्ह लाइफ'चा विचार करतो, तसाच भाषिक जीवनाच्या गुणवत्तेचा विचार करायला नको का?

निराळ्या शब्दांत हा मुद्दा मांडायचा तर मराठी भाषेला का बरं वाचवायची, कशासाठी आणि कुणासाठी वाचवायची याचा विचार नेटानं करायला पाहिजे - आणि तो विचार प्रादेशिक टप्प्यावर, भारतीय टप्प्यावर, आणि जागतिक टप्प्यावर करायला पाहिजे. प्रश्नापासून पळून जाता कामा नये!

## मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास

प्रादेशिक टप्प्यावर विचार करायचा तर एक आठवण करून द्यायला हवी. महाराष्ट्र सरकारने पुरस्कृत केलेल्या राज्य मराठी विकास संस्थेचं ब्रीदवाक्य आहे-'मराठीचा विकास; महाराष्ट्राचा विकास'. महाराष्ट्र प्रदेशातलं माणसाचं जीवन; इथला मुख्य भाषिक व्यवहार आणि त्याचं नियमन करणारी मराठीची भाषाव्यवस्था; मराठी भाषेतलं ललित, वैचारिक, आध्यात्मिक अशा विविध प्रकारचं वाङ्मय; आणि प्रादेशिक जीवनातून आकार घेणारी आणि त्याचबरोबर त्या जीवनाला आकार देणारी संस्कृती असं एक चार गोष्टींचं संकुल आपल्यासमोर आहे. या संकुलाचा समग्रपणे विकास इथं योजायचा आणि साधायचा आहे. मराठी भाषा आणि मराठी वाङ्मय (केवळ मराठी ललित वाङ्मय म्हणजे 'मराठी साहित्य' नव्हे) यांचं या संकुलात महत्त्वाचं स्थान आहे. प्रादेशिक जीवन आणि प्रादेशिक संस्कृती यांमधून प्रादेशिक भाषा आणि वाङ्मय आकार घेतात हे जितकं खरं आहे तितकंच प्रादेशिक भाषा आणि वाङ्मय प्रादेशिक जीवन आणि संस्कृती यांना आकार देतात हेही खरं आहे. या संकुलाचा समग्रपणे विकास होणं म्हणजे त्याला इष्ट दिशेने आकार मिळत राहणं.

भारतीय उपखंडात जीवन-भाषा-वाङ्मय-संस्कृती यांचं महाराष्ट्र हे काय एकच प्रादेशिक संकुल थोडंच आहे? अशी इतरही अनेक संकुलं आहेत; भारताचं एक विशिष्ट प्रादेशिक विभाजन आज आपल्या ओळखीचं झालेलं आहे ते इतिहासाच्या ओघात आणि एका विशिष्ट कालखंडात झालेलं आहे. आज दिसणारी ही संकुलं इसवी सनाच्या सातव्या ते दहाव्या शतकांत उपस्थित झाली आणि भारताचं एक प्रादेशिक पुनर्विभाजन झालं. अगोदरची स्थिती काहीशी निराळी होती. ही घडामोड कशी काय झाली? एक म्हणजे इसवी सनाच्या चवथ्या ते दहाव्या शतकांत प्राचीन भारतीय नगरं आणि नागर जीवन यांचा क्रमाने ऱ्हास झाला. उदाहरणार्थ. श्नुआन-त्सांग या सातव्या शतकातल्या चिनी विद्वानाला



अनुक्रमणिका

आपल्या भारत-दर्शनात अनेक उजाड झालेली वा मोडकळलेली नगरं आढळली. दंडीच्या दशकुमारचरितात वर्णिलेल्या लांबलेल्या दुष्काळाचाही या घडामोडीत हात असावा. पुन्हा हळूहळू अकराव्या ते पंधराव्या शतकांत नगरं वाढीस लागली. मात्र भारत हा खेड्यांचा देश बनला हे चित्र समूळ बदललं नाही, जीवनाला आलेली एक खेडवळ कळा नव्या शहरांतून ही पुरती गेली नाही. पुनर्विभाजनाला कारण झालेली दुसरी गोष्ट म्हणजे लोकसंख्या वाढली आणि विखुरली आणि त्याबरोबर इतिहासक्रमाने भाषांचं विभाजन झालं आणि बोलींचं संधान झालं. एका बाजूला तमिळमधून मलयालम किंवा राजस्थानीमधून गुजराती वेगळी झाली (जशी डॉइचपासून डच किंवा स्पॅनिशमधून पोर्तुगीज वेगळी झाली). दुसऱ्या बाजूला विविध बोलींचा तेलुगू भाषा हा बोलींचा गट बनला (जसा विविध बोलींचा फ्रेंच भाषा हा बोलींचा गट बनला). वेगळ्या झालेल्या भाषांना किंवा बोलींच्या एकत्र येऊन झालेल्या गटाला राजकीय आणि सांस्कृतिक प्रतिष्ठा यथावकाश मिळेलही किंवा मिळणारही नाही, पण ती एक वेगळीच प्रक्रिया आहे-वाङ्मयनिर्मिती, सत्तासमतोल इत्यादी विविध कारणांनी आकार घेणारी ही प्रक्रिया असेल. या प्रादेशिक पुनर्विभाजनाच्या काळातच किंवा जरा मागेपुढे जातिव्यवस्था बळकट होण्याची आणि स्त्रिया व अतिशूद्र यांना वेगळे पाडण्याची प्रक्रिया चालू होती. (इरावती कर्वे आठवण करून देतात की, आजही भारतीय व्यक्तींची ओळख प्रथम भाषानिहाय आणि मग जातिनिहाय होते. 'स्त्रीशूद्रादिक' हा अभद्र शब्दप्रयोग कितव्या शतकापासून वापरात आला याचा शोध घ्यायला पाहिजे.)

भारताच्या प्रादेशिक पुनर्विभाजनातून मराठी बोली-गट उपस्थित झाला. प्रथम मध्यदेशीय बोलींपासून पश्चिम-दक्षिण बोली वेगळ्या झाल्या, त्यांचे पुन्हा गुजराती-राजस्थानी गट आणि मराठी-कोकणी गट वेगळे पडले. याच्यानंतरचा मराठीचा इतिहास हा तिच्या प्रतिष्ठेसाठी केलेल्या प्रयत्नांचा इतिहास आहे. पहिली काही शतकं मराठीला संस्कृत भाषेशी टक्कर द्यावी लागली. 'माझा मराठाचि बोलु कौतुकें' हे ज्ञानेश्वरांचे साभिमान उद्‌गार आणि 'संस्कृत भाषा देवें केली प्राकृत काय चोरापासोनि झाली' हे एकनाथांचे जळजळीत उद्‌गार या एकाच संघर्षाच्या दोन बाजू दिसतात. यादव राजांनी मराठीला राजभाषा बनवली आणि मराठीत रचना करणाऱ्या पंडितांना उत्तेजन दिलं. हा संघर्ष सफल होतो आहे तो अरबी-फार्सीचा प्रभाव वाढला. शिवाजी महाराजांनी मराठीला पुन्हा एकदा राजभाषा बनवले आणि मराठी व्यवहार-भाषा अरबी-फार्सीमध्ये गुदमरून जायची थांबली.

पुढे यथाकाल भारतामध्ये इंग्रजी आणि हिंदी भाषा पुढे आल्या. या सगळ्या संस्कृत आदी प्रतिष्ठित भाषांबरोबर त्या त्या वाङ्मयीन परंपराही मराठी भाषकांना परिचित झाल्या. या सगळ्या प्रतिष्ठेसाठी केलेल्या संघर्षात, मराठीची कमाई अशी की त्यात नाउमेद न होता त्या त्या भाषा आणि वाङ्मयपरंपरा यांच्यापासून मराठीनं स्वतःला समृद्ध आणि विकसित करून घेतलं. उदाहरणार्थ, ऐष, आराम, हौस, ईमान, दोस्ती, जमाना, नशीब अशा नवी वृत्ती आणि दृष्टी आणणाऱ्या कल्पना मराठीनं जवळ केल्या. संस्कृत प्रशस्ती आणि अरबी-फार्सी तवारीख यांच्या संकरातून मराठी बखर जन्माला आली. मराठी जीवन, भाषा, वाङ्मय, आणि संस्कृती केवळ विकसित आणि समृद्ध नव्हे तर वैशिष्ट्यपूर्ण व्हायला कारणीभूत झालेला हा पहिला महत्त्वाचा घटक : प्रतिष्ठेच्या संघर्षातून झालेलं पोषण.

अशाच इतर घटकांबद्दलही खूप सांगण्यासारखं आहे, पण आपण फक्त धावता आढावा घेऊ या. दुसरा सहज लक्षात येणारा घटक म्हणजे महाराष्ट्राचं भारतीय उपखंडातलं उत्तर आणि दक्षिण भारत यांच्या मधलं स्थान. या प्रदेशात दैनंदिन राहणीपासून तो भाषासरणी, भावजीवन, आणि जीवनदृष्टीपर्यंत उत्तर आणि दक्षिण यांचा एक समन्वय आढळतो. तिसरा एक घटक म्हणजे वैदिक आणि अवैदिक, ब्राह्मण आणि श्रमण प्रकृतीच्या विचारसरणी आणि वृत्ती यांचा एक सर्जनशील संघर्ष महाराष्ट्रात होत राहिला. त्याचं एक फल म्हणजे भारतीय भक्ति-परंपरेत मराठीने शरणागतीच्या जोडीला देवाशी सख्यत्व, सामाजिक प्रबोधन, भावव्याकुलतेला आध्यात्मिक चिंतनाची जोड अशी नव्याने भर घातली, स्त्रीपुरुषसमतेचा विचार पेरला. (मराठी स्त्री कधी नवऱ्याच्या पाया पडत नाही, आपण नारायणाची लक्ष्मी आहोत, भोळ्या सांबाची पार्वती आहोत हे ती कधी विसरत नाही.) याच्या जोडीला चवथा घटक म्हणजे जमीनधाऱ्यासाठी जमीनदारी पद्धतीपेक्षा रैयतवारी पद्धतीचा प्रभाव असणं, परिणामी सामान्य श्रमिकाचा पाठीचा कणा शाबूत राहिला. जातिभेद आणि स्पृश्यास्पृश्यभेद यांची धार थोडी कमी झाली. भारतीय स्तरावरच्या आधुनिकतेकडे नेणाऱ्या नवजागरण (१८२० ते १९२०), पददलितजागरण (१९२० ते १९७०) या चळवळी आणि भारतीय अस्मितेचा उदय (१७७० ते १९३०) या घडामोडींमध्ये मराठीभाषक केवळ कालदृष्ट्या अग्रेसर राहिले एवढंच नाही, तर ते अधिक खोलवर जातात (धर्माची चिकित्सा इथे एकोणिसाव्या शतकातच सुरू झाली), अधिक रोखठोक आहेत

(दलितांना दया नको, हक्क पाहिजेत), त्यांच्याकडून हलवून खुंटा बळकट केला जातो (सामाजिक सुधारकांशी सनातन्यांनी बौद्धिक प्रतिवाद केला). मराठी भाषा वाचवायची म्हणजे हे सगळं मराठी कर्तृत्व आणि कमाई वाचवायची. या आढाव्यात तुम्ही तपशील भरले तर मुद्दा अधिक स्पष्ट होईल, मात्र अशा आढाव्यामागे एक वेगळ्या प्रकारची इतिहासाची दृष्टी हवी-जिला वास्तवाचं भान आहे, आणि तेही समग्र मानवी वास्तवाचं भान, प्रसंगी गैरसोयीचं वाटणाऱ्या वास्तवाचंही भान!

मराठीभाषकांची आद्य काळातली प्रतिमा ते दृढ, श्यामल, सधीर, अभिमानी, आणि कलहशील आहेत अशी होती. मराठी भाषकांची आजच्या काळातली स्व-प्रतिमा याहून फारशी वेगळी नाही!

**प्रादेशिकतेचा विकास : भारतीयतेचा विकास**

दुसऱ्या म्हणजे भारतीय टप्प्यावर आपण आलो म्हणजे या प्रश्नाची आणखी काही अंगं आपल्या नजरेत भरतात.

मुलूखगिरी, तीर्थयात्रा, चाकरमानी, आणि मतप्रसार या निमित्तानं मराठी माणूस भारताच्या इतर भागात गेला. उलट इतर भारतातले काही लोक व्यापारउदीम, धर्मप्रसार, चाकरमानी, आणि आधुनिक शिक्षण-संशोधनाच्या महाराष्ट्रातील केंद्रांचा लाभ या निमित्ताने महाराष्ट्रात आले. भारताच्या इतर भागात जाणारा मराठी माणूस कुरकुऱ्या उपरा, किंवा राजसत्तेचा उर्मट हस्तक म्हणून ओळखला गेला नाही, उलट त्यानं त्या त्या प्रादेशिक संकुलात आपापल्या आवडीकुवतीनुसार भरच घातली. महाराष्ट्रात येणाऱ्या इतर भारतीयांना महाराष्ट्रानं सामावून घेतलं. परिणामी आपण भारतीय आहोत याचं भान मराठी माणसानं ठेवलं-बिहारच्या आपत्प्रसंगी मराठी माणूस धावला. आज महाराष्ट्राची प्रादेशिक संस्कृती म्हणजे केवळ मराठीभाषकांची, केवळ बहुसंख्याक समाजाची संस्कृती राहिलेली नाही. ती अखिल भारताच्या संस्कृतीप्रमाणेच बहुजिनसी आहे, आणि हा बहुजिनसीपणा केवळ मराठी लोकांच्या जेवण्याखाण्यापुरता मर्यादित नाही! या बहुजिनसी महाराष्ट्रीय जनतेमधील बहुविध घटकांचं एकमेकांशी नातं जोडणारी संपर्क-भाषा मात्र मराठीच आहे. हिंदी किंवा इंग्रजी मार्फत संपर्क होतो, पण तो नातं जोडणारा संपर्क ठरत नाही. शालान्त परीक्षेला प्रादेशिक भाषा म्हणून मराठी आवश्यक केली ते योग्यच झालं.

भारतीयतेचा विकास हा प्रादेशिकतेचा विकास झाल्याशिवाय होणार नाही.

इंग्रजीवर किंवा हिंदुस्तानी या संपर्क-भाषेवर हुकमत पण प्रादेशिक भाषा नीट येत नाही असा एक नेतृत्वाचा वाण भारताच्या प्रदेशांतून कुठेकुठे दिसतो. राजीव गांधी, नवीन पटनाईक, उमर फारूख ही राजकीय क्षेत्रातली काही उदाहरणं. इतर सामाजिक क्षेत्रांतून किंवा सांस्कृतिक क्षेत्रात देखील अशी मंडळी कुठेकुठे दिसतात. हा हानिकारक अपवाद उद्या सामान्य नियम तर होणार नाही ना?

या टप्प्यावर आणखी एक गोष्ट नजरेत येते. ती म्हणजे भारत हा एकजिनसी होणे किती धोक्याचं आहे ही गोष्ट. या बहुजिनसी भारताला जोडणारी संपर्क-भाषा असणं केवळ उपयुक्त नाही तर आजच्या संपर्क-युगात आवश्यक आहे; तीच गोष्ट अनुवादकार्याची. अनुवादकार्याची आपल्याकडे होणारी उपेक्षा खेदजनक आहे. भारतीयतेच्या समृद्ध विकासामधला तो एक अडसर होऊ शकेल. पण हिंदीमय झालेला किंवा इंग्रजीमय झालेला आणि म्हणून अनुवादाची गरज संपलेला भारत कंटाळवाणा तर होईलच, पण तो दुबळाही होईल. व्यावहारिक पातळीवर बोलायचं तर भारतातल्या मनुष्यबळाची बहुविधता एक जमेची बाजू आहे-मग तो लष्करभरतीचा प्रश्न असो, की श्रमिक कौशल्याचा प्रश्न असो, की बौद्धिक-भावनिक क्षमतांचा प्रश्न असो. ब्रिटिश प्रशासकांनी हे जसं अचूक हेरलं होतं तसंच ते अर्वाचीन भारतीय उद्योजकांनीही हेरलेलं आहे. भारताच्या प्रशासनाला आणि अर्थव्यवस्थेला याचा नक्कीच लाभ होत असणार. व्यावहारिक पातळीच्या पलीकडे वैचारिक किंवा कलात्मक सर्जकतेच्या पातळीवरही हे लागू आहे. प्राचीन आणि मध्ययुगीन भारताकडे वळून बघितलं तरी ही मनुष्यबळाची विविधता भारतीय सर्जकतेच्या वैभवात कशी परिणत होते हे दिसून येते. संस्कृतविद्येचा विचार केला तर व्याकरण महाराष्ट्रात, सामवेदी परंपरा गुजरातेत, न्याय-परंपरा बंगालमध्ये, साहित्यशास्त्र काश्मिरात, वेदान्ताच्या परंपरा दाक्षिणात्यांमध्ये फुललेल्या दिसतात. त्यात्या प्रदेशाची तीती बलस्थानं दिसतात. अशीच स्थिती मध्ययुगीन आणि अर्वाचीन प्रयोगजीवी आणि प्रदर्शनजीवी कलापरंपरांच्या संबंधानं असल्याचं दिसून येतं. मात्र ही विविधता जमेची बाजू केव्हा ठरेल? प्रादेशिक संकुलाचा काही विशिष्ट दिशेने विकास हा एकांगी असण्याचा दुबळेपणा न ठरता समग्र भारतीय संकुलाचं बलस्थान केव्हा ठरेल? भारतीय एकतेचे भान सतत जपायला पाहिजे. आपापल्या प्रदेशाच्या सीमा ओलांडून भारताच्या इतर प्रदेशांशी संपर्क साधत रहायला पाहिजे. (आपला शुद्धलेखनाचा प्रश्न संपवायला गुजरातीने १९२९ मध्ये 'जोडणी-कोश' बनवला.

मराठीला याची दादच नव्हती आणि तीच युक्ती सापडायला २००१ साल उजाडलं![१]) त्यासाठी भारतीय संपर्क-भाषांची उपेक्षा करून चालणार नाही. माझ्या आयुष्याची पुष्कळशी वर्षे इंग्रजी शिकण्यात वाया गेली असं घोकणाऱ्या टिळकांनी मराठी भाषकांना चुकीचा संदेश दिला. बांगलाभाषकांनी बांगला भाषेची जोपासना केली पण इंग्रजीवरही प्रभुत्व मिळवण्याचं सोडलं नाही. टिळकांनी सुरू केलेलं 'Malıratta' पत्र अल्पगामी आणि अल्पायुषी ठरलं; त्यांचा अखिल भारतीय लोकसंग्रह मौखिक संवादावर अवलंबून राहिला. आंबेडकरांनी इतर भारतीय प्रदेशांतील दलित कार्यकर्त्यांशी सातत्यानं संपर्क ठेवल्याचं आढळत नाही. हिंदी भाषिक प्रदेशातील दलितांपर्यंत आंबेडकरांचं नावही वेळेवर पोचलं नाही, मग कार्य आणि विचार यांची गोष्ट तर दूरच. मराठी अस्मिता फुलते फळते ती भारतीय परिदर्शातच, स्वतःला कोंडून घेऊन नव्हे तर जोडून घेऊन उगीच नाही पुण्याच्या सवाई गंधर्व संगीत महोत्सवातली काटेतोल पण खुल्या मनाची रसिकता आणि अनौपचारिक पण उत्स्फूर्त शिस्त बाहेरच्या कलाकारांना आणि रसिकांना भुरळ घालत!

थोडक्यात सांगायचं तर मराठी भाषेला वाचवायचं ते केवळ महाराष्ट्राच्या भल्यासाठी नव्हे तर ती एकंदर भारताच्या भल्यासाठी एवढंच मला म्हणायचं आहे. अर्थातच असं म्हणताना 'महाराष्ट्र मेला तर राष्ट्र मेले । मराठ्याविना राष्ट्रगाडा न चाले ॥' असा काही भाबडा अभिनिवेश मला मुळीच अभिप्रेत नाही.

**भाषिकतेचा विकास : माणसाचा विकास**

आता तिसऱ्या म्हणजे जागतिक टप्प्यावर यायला हरकत नाही.

मानवी जीवनाची विविधता, भाषिक-वाङ्मयीन-सांस्कृतिक विविधता विकासाला कशी उपकारक होते हे भारतीय संदर्भात दिसतं तसं ते जागतिक पातळीवर सुद्धा दिसतं. मनुष्यजातीच्या इतिहासात जागतिकीभवन फार पूर्वीपासून सुरू झालेलं आहे. प्राचीन युगात माणसं आणि त्यांच्या जगण्याच्या रीती इकडून तिकडे आणि तिकडून इकडे दीर्घ अंतरावर जाऊ लागल्या. अर्थव्यवहार आणि सत्ताव्यवहार यांची कक्षा विस्तारू लागली. संस्कृत, चिनी, लॅटिन सारख्या भाषांना विस्तीर्ण प्रदेशात अभिजात भाषांचं स्थान मिळायला लागलं. भारतीय उपखंडात जागतिकीभवनाचा 'जगा आणि जगू द्या' या अनेकान्तग्राही वाणाचा छोटेखानी प्रयोग (उदाहरणार्थ) झाला, तर रोमन साम्राज्यात आणि नंतर रोमन कॅथलिक चर्चमध्ये (उदाहरणार्थ) 'जे आपल्याबरोबर नाहीत ते आपले बांधव नाहीत' या

एकान्तग्राही वळणाचा जागतिकीभवनाचा आणखी एक छोटेखानी प्रयोग झाला. (जगाच्या परिदर्शात यांना 'छोटेखानी'च म्हणायला पाहिजे!) आधुनिक काळात जग व्यापणाऱ्या युरोपीय सत्ताकारणामधून आणखी एक प्रयोग होऊ घातला आहे. एकान्तग्राही आर्थिक नगाऱ्यापुढे विविधतेतून विकास हे जागतिकीभवनाचं एक महत्त्वाचं अनेकान्तग्राही अंग अक्षम्य रीतीने दुर्लक्षित राहिलं आहे. निराशेपोटी काहीजण हा नगारा फोडून टाकू पाहतात. तर काहीजण अनेकान्तग्राही तुणतुणं फेकून द्यायला निघाले आहेत. दोघांच्याही लक्ष्यात यायला पाहिजे की हे जागतिकीभवन आहे, जागतिकीकरण नाही. ते जसं टाळता येणार नाही तसं लादताही येणार नाही. दुसरं म्हणजे ही जागतिकीभवनाची क्रिया एकान्तग्राहीच व्हायला पाहिजे किंवा अनेकान्तग्राहीच व्हायला पाहिजे असा दुराग्रह न धरता त्यांचा काही समन्वय होतो का हे पहायला पाहिजे. (वाहतुकीची साधनं बहुविध असू देत, पण वाहतुकीची शिस्त एकविध पाहिजे हे अशा समन्वयी प्रयोगाचं एक छोटेखानी उदाहरण.)

पण खरी गोष्ट अशी आहे की विविधता केवळ एक साधनमूल्य नाही तर एक स्वतंत्र साध्यमूल्य देखील आहे. आज पर्यावरणाचं संगोपन आणि संवर्धन कसं करायचं याचा विचार करताना जैविक बहुविधता संवर्धित करण्याचा, निदानपक्षी आहे ती टिकवण्याचा विचार पुढे आलेला आहे. भोवतालचं बदलतं वातावरण, जलावरण, मृदावरण आणि तसंच भोवतालची बदलती सजातीय-विजातीय जीवसृष्टी मिळून पर्यावरण बनतं आणि ते आतून बदलत्या जीव-जातीला वेढून असतं. काळाच्या ओघात निसर्गक्रमानं जुन्या जाती नष्ट होतात आणि नव्या जाती उत्पन्न होतात. गेल्या काही शतकांत या निसर्गक्रमात मनुष्यजातीचा हस्तक्षेप खूपच वाढला आहे. त्यामुळे जीवजाती आणि जीव-उपजाती यांची एकूण विविधता नको इतकी कमी होत आहे. (शहरातल्या चिमण्या कुठे गेल्या? बिबट्या गावात का येतो? चित्ता नामशेष कसा झाला? तांदुळाच्या, केळ्याच्या काही उपजाती कुठे गेल्या? देवराया वाढवल्या नाहीत तर औषधी वनस्पती मिळेनाशा होणार का?- अशासारखे प्रश्न ही केवळ एक चुणूक आहे.) मग या जैविक बहुविधतेचा दाखला काही प्रमाणात मनुष्यसृष्टीला, तिच्यामधल्या जगण्याच्या रीतींना, आचारविचारांचे संकेत आणि आस्थाविषय यांना, माणसांच्या समाजरीतींना, आणि व्यक्तिमत्त्वातील क्षमता आणि प्रेरणा यांना लावता येईल. (जगातल्या भाषा आणि उपभाषा यांची संख्या रोडावते आहे त्याचं काय? काही दशकांनी जगभरची मुलं तेच ते कपडे

घालणार, तेच ते खेळ खेळणार, तीच ती कॉमिक्स वाचणार का? एकच एक कुटुंबरचना सगळीकडे पसरणार का?-अशासारखे प्रश्न विचारता येतील.) जीवसृष्टी काय किंवा मनुष्यसृष्टी काय, विविधता म्हणजे शंभर फुलं फुलणं. शंभर फुलं फुलणं हे केवळ विकासाचं साधन नाही तर जीवनाचं स्वतंत्र वैभव आहे-निदानपक्षी मनुष्यजीवनाचं वैभव आहे आणि (निदान निसर्गावर प्रेम करणाऱ्यांच्या नजरेत) पर्यावरणाचं वैभव आहे. (प्रेमाचा विषय असणं म्हणजे नितान्त आस्थेचा विषय असणं.) निसर्गातील विविधता म्हणजे केवळ जैविक तंत्रज्ञांची किंवा उद्योजकांची सोय नव्हे. मनुष्यजीवनातील विविधता म्हणजे केवळ आर्थिक व्यवस्थापनाची किंवा प्रशासनाची सोय नव्हे.

सगळा भारत एकजिनसी, भाषेच्या क्षेत्रात केवळ हिंदीमय किंवा केवळ इंग्रजीमय झाला तर? तर भारतीय जीवन नीरस आणि कंटाळवाणं होईल. भारतीय समुदाय मग नितान्त आस्थेचा म्हणजे प्रेमाचा विषय राहणार नाही. भारतीय विविधतेचं मोल अतिपरिचयामुळं भारतीयांच्या कधीकधी ध्यानातही येत नाही. (उपयुक्ततावादी मंडळींना तर विविधतेचं वैभव म्हणजे केवळ रोमँटिक स्वप्नरंजन वाटतं किंवा आर्थिक विकासातला एक नसता अडथळा वाटतो.) भारतीयांनी एकजिनसी जीवनाला कंटाळलेल्या आणि भारताच्या प्रेमात पडलेल्या विदेशी मंडळींकडून भारताच्या विविधतेचं वैभव कळवून घ्यावं. तर मग मनुष्यजीवनातल्या ह्या विविधतेला जपायचं कसं आणि जोपासायचं कसं?

जीवनातल्या कृती आणि आचार, जाणिवा आणि विचार काही वळणांनी, काही संकेतांनुसार चालतात. कशाची दखल घ्यायची याचा या कृती आणि जाणिवा शोध घेतात आणि तो शोध कुठे संपणार याचा वेध घेतात म्हणजेच त्यांना संकेतांबरोबर आस्थाविषय लागतात. (लहान मुलांसाठी कपडे निवडताना ते मळखाऊ आहेत ना, खेळताना तंग होणार नाहीत ना, वाढीच्या मापासाठी त्यांना टक घातले आहेत ना अशी आस्थेवाईक चौकशी होते. पोटाची खळगी हा आस्थाविषय आणि त्यात कोणता घास घालायचा हा देखील आस्थाविषयच.) या संकेतांना आणि आस्थाविषयांना संस्कार वळण देतात. हे संस्कार परंपरेला अनुसरतात किंवा प्रतिभेला अनुसरतात. ह्या संस्कारांतून परिणत होते ती संस्कृती.

माणसाच्या जीवनाला, आचारविचारांना वळण देणारे असंख्य संस्कार असतात-बुद्धिगम्य, कल्पनागम्य, भावनिक, आणि आध्यात्मिक म्हणजे जीवनदृष्टिविषयक संस्कार. (परतत्त्व न मानणाऱ्या नास्तिकाचं सुद्धा एक

अध्यात्म असतं.) या विविध संस्कारांचं एक महत्त्वाचं वाहन म्हणजे ललित, वैचारिक, आध्यात्मिक, तांत्रिक असं विविध प्रकारचं वाङ्मय. वाङ्मय म्हणजे त्यात्या समाजात वारंवार पारायण होण्याजोगा मानला जातो असा सर्व मजकूर.

वाङ्मयीन व्यवहारामार्फत आणि दैनंदिन शब्दव्यापारातून संस्कारांना आकार देणारे भाषा हे एक माध्यम आहे. भाषाव्यवहार व्यवहारसापेक्ष असू शकतो, परिभाषासापेक्ष असू शकतो, किंवा शैलीसापेक्ष असू शकतो.

संस्काराचं माध्यम ठरू शकणारी ती भाषा, संस्कारांचं वाहन ठरू शकणारं ते वाङ्मय, आणि संस्कारांची बांधणी करणारी ती संस्कृती यांचं एक भाषाकेंद्री संकुल बनू शकते. महाराष्ट्र हे असंच एक संकुल आहे हे आपण पाहिलेलंच आहे. मनुष्यजीवनातली विविधता जपताना आणि जोपासताना अशा प्रादेशिक संकुलांना किती महत्त्वाचं स्थान असेल हे एव्हाना वेगळं सांगण्याची गरज नाही. पण हा प्रश्न केवळ मराठी, हिंदी, इंग्रजी, जपानी इत्यादी भाषांची शंभर फुलं फुलू देण्याचा नाही. हा आजच्या जगात भाषिकतेचं फूल जपण्याचाच प्रश्न उपस्थित झाला आहे. कसं ते पहा. माणसाचा विकास आणि भाषिकतेचा विकास परस्परांशी निगडित आहेत.

हल्ली असे मराठीचे पक्षपाती भेटतात की ज्यांना मराठीचं सोयरसुतक नसतं आणि असे इंग्रजीचेही पक्षपाती भेटतात की ज्यांना इंग्रजीचं सोयरसुतक नसतं. त्यांना त्यातून फक्त अर्थकारण वा सत्ताकारण साधायचं असतं. (इथं मराठीच्या दुय्यम-तिय्यम स्थानाबद्दल खंत करणाऱ्या कुसुमाग्रजांची आठवण होते. ते जसे मराठीचे प्रेमी होते तसे इंग्रजीचेही प्रेमी होते.) एके काळी आपल्या साम्राज्यापेक्षा आपल्या शेक्स्पियरविषयी गर्व वाहणारे इंग्रज अलीकडे शेक्स्पियरला विसरत चालले होते; मध्यंतरीच्या दोन गाजलेल्या शेक्स्पियरविषयक चित्रपटांनी त्यांच्या विस्मरणशक्तीवर हात चालवला नसता तर इंग्लंडमध्ये शेक्स्पियरचं जरा कठीणच होतं! विज्ञान आणि तंत्रज्ञानाची कास धरून पर्यावरण समजावून घेणं आणि त्याची सुयोग्य हाताळणी करणं म्हणजे भाषेला सोडचिठ्ठी देणं नव्हे. विज्ञानव्यवहार आणि तंत्रज्ञानव्यवहार यांत मुरलेल्या मंडळींना विचारा; विशेषतः परंपरेचं अनुसरण न करता प्रतिभेचं अनुसरण करणाऱ्या वैज्ञानिकांना आणि तंत्रज्ञांना विचारा म्हणजे भाषेबद्दलचा हा भ्रम दूर होईल. 'काय बिघडणार आहे मराठी भाषा नाही वाचली तर?' असा प्रश्न निरागसपणे अज्ञानापोटी विचारणाऱ्या तरुणाईचं एक वेळ सोडा. (त्यांना हा लेख वाचायला देता येईल.) पण हाच प्रश्न उर्मटपणे विचारणाऱ्या चंगळ,

करियर, जमल्यास सत्ता यांच्यामागे लागलेल्या तरुणाईचं काय? (अशा तरुणतरुणींचा वाङ्मयीन व्यवहार आणि शब्दव्यापार किती तुटपुंजा असतो आणि त्यांचे आस्थाविषय किती तोकडे असतात ते पाहण्याजोगं ठरेल.) त्यांच्यापासून भाषेचं फूल वाचवायचं आहे. केवळ मराठी भाषा वाचवायची नाही आहे, तर मुदलात भाषिकताच वाचवायची आहे. मराठी जेमतेम तगवायची नाही आहे, तर समृद्ध आणि विकसित रूपात जगवायची आहे. एकंदर भाषिक जीवनाची गुणवत्ता जोपासायची आहे, मग ते भाषिक जीवन कोणत्याही भाषेतलं असो.

मराठी वाचवण्याच्या या सर्वच प्रश्नाचा पैस किती विस्तृत आहे याची कल्पना एव्हाना यावी. दुर्दैवानं ही कल्पना ना आपल्या सामाजिक, सांस्कृतिक, किंवा राजकीय नेतृत्वाला असते की जे या प्रश्नाच्या सोडवणुकीसाठी काही भरीव काम करू शकतात; ना सामान्य जनतेला असते, की जिला या प्रश्नाची दूरगामी झळ पोचणार असते. हा संस्कृत, अरबी-फार्सी, इंग्रजी, हिंदी या सत्तासूचक भाषांना हटवायचा किंवा त्यांचा उदोउदो करण्याचा मुद्दा नाही, तर आपल्याला ग्रासणारा न्यूनभाव काढून टाकून त्या त्या भाषांचा सदुपयोग करून घेण्याचा आहे. हा केवळ कुणाकुणाच्या नोकऱ्या वाचवण्याचा प्रश्न नाही, तर भाषेशी निगडित अशा तऱ्हेतऱ्हेच्या सेवा उपलब्ध करून देण्याचा प्रश्न आहे. हा केवळ या गल्ल्यावस्त्यांतून पसरलेल्या प्रजेमध्ये मराठी तगेल यावर पोकळ समाधान मानण्याचा मुद्दा नाही, तर मराठीच्या वापराची गुणवत्ता वाढवण्याचा आणि तिची प्रतिष्ठा सुस्थिर करण्याचा मुद्दा आहे. हा महाराष्ट्रातील अ-मराठी महाराष्ट्रीयांवर मराठी लादायचा कार्यक्रम नाही, तर महाराष्ट्राच्या प्रादेशिक जीवनाशी त्यांचं नातं मराठीच्या मार्फत जोडण्याचा कार्यक्रम आहे. हा केवळ जागतिकीकरण लादायचा जे उद्योग करीत आहेत त्यांच्याशी लढण्याचा किंवा त्यांना शरण जाऊन मोकळं होण्याचा प्रश्न नाही, तर इतिहासातून दीर्घ काळ चालत आलेली जागतिकीभवनाची क्रिया आहे तिला सर्वांना अनुकूल आणि हितकारी वळण लावण्याचा प्रश्न आहे, केवळ आर्थिक-राजकीय परिणामांवर न विसंबता या क्रियेला इतर परिमाणं कशी लाभतील हे पाहण्याचा प्रश्न आहे. या चालीवर आणखी कितीतरी सांगण्यासारखं आहे किंवा जे इथवर सांगितलेलं आहे त्यावरून ताडण्यासारखं आहे.

असं काही न करता फक्त आपल्या नाकापुढचं पाहणं हे एक तर पढतमूर्खलक्षण आहे किंवा करंटलक्षण आहे.

**संदर्भ टीप :**

१) *पहा “मराठीतील पहिला जोडणी-कोश : ‘मराठी लेखन कोश’”, भाषा आणि जीवन १९:४ दिवाळी २००१

**इतिकथन**

महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक संस्था (पूर्वीची डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रान्स्लेशन सोसायटी), पुणे यांनी लेखकाच्या मराठी भाषेच्या सेवेखातर सन्मान केला. त्या प्रसंगी केलेल्या भाषणाचा हा लिखित विस्तार.

■

**७ धनंजय, ७५९/८३ भांडारकर रस्ता गल्ली ६ द्वारा, पुणे ४११ ००४.**

**भाषा वार्ता**

## कॉम्प्युपद्य

अमेरिकन व्यापारी नौदलात काम करणाऱ्या शुभानन गांगल यांनी “कॉम्प्युपद्य” नावाचे एक नवे मराठी सॉफ्टवेअर (“आज्ञावली”) तयार केले आहे. मराठी भाषेच्या लेखनामध्ये भाषेच्या उच्चाराच्या अंगाचा फारसा विचार केला गेला नाही. त्यामुळे लिखित मजकूर वाचताना उच्चाराची वैशिष्ट्ये कळत नाहीत. उदा. “चटई” आणि “चमत्कार” मधील “च”चे वेगळे उच्चार दाखवण्याची सोय देवनागरी लिपीमध्ये नाही. आणि गद्यवाचनापेक्षा पद्यवाचनाच्यावेळी उच्चारांना अधिक महत्त्व असते परंतु तशी सोय नसल्याने पद्याचे वाचन अपुरे राहते. ही उणीव दूर करण्यासाठी अक्षरातील स्वर-व्यंजनांच्या उच्चाराची वैशिष्ट्ये संगणकाच्या “स्मृती”मध्ये घालून पद्याचे वाचन करण्याची ही “आज्ञावली” त्यांनी तयार केली आहे. या पद्याच्या भाषेला “उच्चारांच्या ओळखीची जाण” असेल. या भाषेत फोनेटिक स्पेलिंग आणि लघु-गुरुची मांडणी आहे. त्यातून अक्षरांच्या उच्चारांचे लेखी स्वरूप स्पष्ट होईल आणि त्यांचे उच्चार कळतील. उच्चारांचे हे वस्तुनिष्ठ निकष तयार करण्याचा गांगलांचा हा प्रयत्न प्राथमिक अवस्थेत आणि पद्यापुरता मर्यादित असला तरी पुढे त्यामुळे संगणकीय देवनागरी लिपीच्या रूपात खूपच प्रगती करता येईल. उच्चारांची पद्यभाषा तयार करण्याचा हा प्रयत्न, सर्वप्रथम मराठी भाषेमध्ये होतो आहे, ही बाब महत्त्वाची आहे. त्यांचा पत्ता - १९/२०, आयडियल अपार्टमेंटस्, गुलमोहर रोड, जुहू, मुंबई ४०० ०४९.

■












# मत्स्यभेदाचा चकवा

**माधव ना. आचार्य**

महाभारत हा आपल्या पारंपरिक सांस्कृतिक जीवनाचा एक अविभाज्य घटक आहे. त्यातील कितीतरी घटना व व्यक्तींप्रमाणेच विविध प्रसंगांचे तपशील आपल्या जाणिवेचा व तद्नुसारी भाषेचा नकळत भाग बनून गेले आहेत. मात्र काही वेळा मूळ महाभारतीय तपशिलांत व त्यांच्या आपल्या मनात रूतून बसलेल्या प्रतिमांमध्ये फरक असतो. हा फरक इतका साधा असतो की मुद्दाम लक्ष दिल्याशिवाय तो जाणवतही नाही. या संदर्भातील एका गमतीदार प्रसंगाचा हा सहज घेतलेला एक धांडोळा.

महाभारताच्या आदिपर्वातील द्रौपदीस्वयंवराचा प्रसंग आपल्या सर्वांच्याच परिचयाचा आहे. यावेळी एक पण लावला होता. काय होता तो? नीलकंठी टीकेच्या लोकप्रिय पाठानुसारच तो पाहू. द्रुपदाने केलेली योजना अशी होती -

*दृढं धनुरनानम्यं कारयामास भारत ॥*
*यंत्रं वैहायसं चापि कारयामास कृत्रिमम् ।*
*तेन यंत्रेण समितं राजा लक्ष्यं चकार सः ॥*

(आदि. १८५ . ९-१०)

= त्याने एक वाकविता न येण्याजोगे धनुष्य तयार करविले. आकाशात फिरणारे एक कृत्रिम यंत्र तयार करून घेतले. त्या यंत्रासारखेच एक लक्ष्यही राजाने तयार केले.

नंतर स्वयंवरार्थ आलेल्या राजेलोकांना उद्देशून तो म्हणाला,

*इदं सज्ज्ं धनुः कृत्वा सज्जैरेभिश्च सायकैः ।*
*अतीत्य लक्ष्यं यो वेद्धा स लब्धा मत्सुतामिति ॥*

(पूर्वोक्त - ११)

= हे धनुष्य सज्ज करून तयार ठेवलेल्या बाणांनी जो पलीकडील लक्ष्याचा भेद करील त्याला माझी मुलगी मिळेल.

- यानंतर द्रौपदीचा भाऊ धृष्टद्युम्न सर्वांना पण समजावून देताना म्हणतो,

*इदं धनुर्लक्ष्यमिमे च बाणाः*
*श्रुण्वन्तु मे भूपतयः समेताः ।*
*छिद्रेण यन्त्रस्य समर्पयध्वं*
*शरैः शितैर्व्योमचरैर्दशार्धैः ॥*
*एनन्महत् कर्म करोति यो वै*
*कुलेन रूपेण बलेन युक्तः ।*
*तस्याद्य भार्या भगिनी ममेयं*
*कृष्णा भवित्री न मृषा ब्रवीमि ॥*

*(पूर्वोक्त - ३५-३६)*

(संशोधित प्रतींतही असाच पाठ आहे.)

= हे धनुष्य आणि हे बाण. नृपांनो सर्वजण माझे बोलणे ऐका. या यंत्राच्या छिद्रातून पाच तीक्ष्ण बाण आरपार मारा. जो कोणी हे कठीण काम करील - तो जर थोर कुलात जन्मलेला, रूपवान व बलवान असेल - तर माझी ही बहीण कृष्णा त्याची पत्नी होईल. हे माझे सत्यवचन आहे.

- आता येथे ते 'लक्ष्य' काय होते, याचा निर्देश नाही. नंतरच्या हकीगतीतही केवळ 'लक्ष्यभेद' असाच उल्लेख आहे.

- माझ्यासमोर यावेळी महाभारताची दोन भाषांतरे आहेत. एक - प्रा. न.र. फाटक संपादित - सुरेखा प्रकाशनाचे (प्रथम खंड - १९६७) व दुसरे - डॉ. रा.शं. वाळिंबे संपादित, अनुवादित विदर्भ मराठवाडा बुक कंपनीचे (प्रथम खंड - १९८२). - या दोघांनीही उपरोक्त श्लोकांच्या भाषांतरांत मुळाप्रमाणेच 'लक्ष्यभेद' असाच शब्द योजला आहे.

- आता या अध्यायाच्या थोडा मागे - आदिपर्वाच्या आरंभीच्या अध्यायांकडे जातो. पहिल्या अध्यायात दोनवेळा व दुसऱ्यात एकदा या लक्ष्यभेदाचा उल्लेख आलेला आहे. यांपैकी पहिल्या अध्यायातील उल्लेख पाहू. येथे सौती अन्य ऋषींना कथा थोडक्यात सांगतो आहे. त्यात एके ठिकाणी धृतराष्ट्र व संजय यांचा संवाद येतो. नैराश्यग्रस्त धृतराष्ट्र संजयाला म्हणतो,

*यदा श्रौषं धनुरायम्य चित्रं*
*विद्धं लक्ष्यं पातितं वै पृथिव्याम्.... ।*

*(आदि. १. १५०)*

(= जेव्हा ते विलक्षण धनुष्य वाकवून (अर्जुनाने) लक्ष्य छिन्नविछिन्न करून

भूमीवर पाडले, असे मी ऐकले.....)

- धृतराष्ट्राच्या बोलण्यात पुन्हा या लक्ष्यवेधाचा उल्लेख लगेच पुढीलप्रमाणे येतो,

यदा श्रौषं द्रौपदीं रंगमध्ये
लक्ष्यं भित्त्वा निर्जितामर्जुनेन । ...... (१.१५४)

(= जेव्हा स्वयंवर समारंभात लक्ष्यभेद करून अर्जुनाने द्रौपदीस जिंकल्याचे मी ऐकले.....)

- आता या दोन्ही ठिकाणींही लक्ष्यभेद एवढाच उल्लेख आहे. ते लक्ष्य काय होते, याचा उल्लेख नाही.

- परंतु उपरोक्त भाषांतरांमध्ये काय घडते ते पहा. (१.१५०) चा अनुवाद फाटक संपादित प्रतीत असा आहे -

'द्रुपद राजाच्या सभेत सर्व राजांच्या समक्ष
अर्जुनाने लक्ष्यभेद करून मत्स्य पृथ्वीवर पाडल्याचे'..... (मी ऐकले.) इत्यादी.....

- (१.१५४)चा वाळिंबे यांचा अनुवाद असा आहे -

'राजांच्या समाजामध्ये मत्स्यवेध करून अर्जुनाने द्रौपदीला जिंकल्याचे ..... मी ऐकले.'......

- आता या दोन ठिकाणी मुळात नसलेला 'मत्स्य' कुठून आला? तसे हे दोघेही अनुवादक काटेकोरपणे लिहिणारे आहेत. तेव्हा शक्यता अशी दिसते की, यांच्या मनातच महाभारताचा जो तपशील रुतून बसलेला आहे, त्यातील हा मत्स्य त्यांच्या नकळत येथे आला असावा.

- या भाषांतरकारांची बात सोडा. महाभारताविषयी चिकित्सक पद्धतीने लिहिणाऱ्या विवेचकांनाही या मत्स्याने चकविले आहे. दोन उदाहरणे पाहू. पहिले - '(आक्षेपांच्या संदर्भात') महाभारताचे वास्तव - दर्शन' घडविणारे प्राचार्य अ.दा. आठवले. (१९७०) प्राचार्य आठवल्यांनी या ग्रंथात आनंद साधले, दुर्गा भागवत, इरावती कर्वे इत्यादींसह अनेक ललित व अललित लेखकांचा परामर्श घेतला आहे. तो घेताना महाभारताच्या मूळ संहितेमधील तपशिलांमध्ये लहानसाही बदल करणाऱ्यांना त्यांनी चांगलेच धारेवर धरले आहे. स्वाभाविकच त्यांच्याकडून अचूक तपशिलाची अपेक्षा आपण करतो. परंतु 'महाभारतातील कर्ण' या प्रकरणात उपरोक्त (आदि १८५ . ३५-३६) हे श्लोक उद्‌धृत करून त्यांचा अनुवाद करताना



अनुक्रमणिका

ते लिहितात, 'धृष्टद्युम्नाने स्वयंवराच्या प्रारंभीच जो कोणी मत्स्यभेद करील आणि कुलाने, रूपाने, बलाने आमच्या घराण्याच्या तोडीचा असेल त्यालाच माझी बहीण माळ घालील, असे प्रतिज्ञापूर्वक प्रकट केले होते.' (पृ. ४०)

त्यानंतर स्वयंवरोत्तर युद्धवर्णनाचा उल्लेख करतानाही प्राचार्य आठवले लिहितात, 'द्रौपदीस्वयंवराच्या वेळी अर्जुनाने ब्राह्मण वेषात मत्स्यभेद करून द्रौपदी जिंकल्यानंतर.......' (पृ. ४२)

- दुसरे चिकित्सक आहेत - दार्जी पणशीकर.

'कर्ण खरा कोण होता?' (१९७८) यामध्ये उपरोक्त धृष्टद्युम्नाचे सभेतील बोलणे अनुवादताना ते लिहितात, 'कुलाने, रूपाने आणि बलाने युक्त असून जो पाण्यात पाहून वर फिरत असलेल्या माशाचा भेद करील त्याच्याच गळ्यात द्रौपदी वरमाला घालील.' (पृ. २१)

- येथे दार्जींनी माशाबरोबर पाणीही आणले आहे.

- सामान्य वाचकांचे सोडाच परंतु महाभारताच्या यथामूल अनुवादाचा दावा करणारे अनुवादक व महाभारताच्या मूळ तपशिलांसंबंधाने जागरूक असणारे विवेचक या दोघांच्याही जाणिवेत हा 'मत्स्य' रुतून बसावा, याचे आश्चर्य वाटते.

- आता थोडे मागे जाऊ या. प्राचीन मराठीतील महाभारतानुवादकात मुक्तेश्वर (आदि, सभा, वन, विराट व सौप्तिक) व श्रीधर (पांडवप्रताप) हे सापेक्षतः अधिक लोकप्रिय कवी आहेत. तेव्हा या लक्ष्यभेदाच्या संदर्भातील त्यांचे वर्णन पाहू.

- मुक्तेश्वराच्या आदिपर्व अ. ३९ ते ४१ मध्ये द्रौपदीस्वयंवराचे वर्णन येते. त्यातील धृष्टद्युम्नाने राजेलोकांना जे आवाहन आहे ते मुक्तेश्वराच्या शब्दांत असे -

*'हे प्रचंड धनुष्य धरूनि करीं । चक्ररंध्रें पंचशरीं ।*
*यंत्र भेदील निर्धारीं । लक्षालक्ष न चुकतां ॥*
*तयासी हे प्रमदांचि स्वामिणी । माळ घालील माझी बहिणी ।*
*सभाग्य असेल तेणें करणी । करूनि येथें दाखवावी ॥....'*

*(आदि. अ. ४१ ओव्या ४४ व ४५ - प्रियोळकर संपादित प्रत.)*

- येथे स्थूलपणे महाभारताचे प्रामाणिक अनुसरण आहे. परंतु थोडे पुढे जाऊन पाहू.

अजुर्नाने केलेल्या लक्ष्यभेदाचे वर्णन करताना मुक्तेश्वर लिहितो,

*स्मरोनियां यादवराणा । भावें चिंतिलें द्रोणचरणा ।*
*अधोदृष्टी पंचबाणा । व्योमसूत्रीं विंधिलें ॥*

*तें अवक्र नळुकाचक्र । भेदूनि पाडिलें मकरयंत्र ।*
*देखोनि सहस्रनेत्राचे नेत्र । आनंदाश्रु सांडिती ॥*

*(अ. ४१. ओव्या ७० व ७१)*

आता येथे 'अधोदृष्टी' कशासाठी? आणि 'मकरयंत्र' कुठले?

याहूनही विलक्षण गंमत अशी की, या आधीच्या वर्णनात 'मत्स्य' आला आहे. द्रुपदाने स्वयंवराचा जाहीर केलेला पण मुक्तेश्वराच्या शब्दांत असा आहे -

*'मत्छयंत्र गगनोदरीं । धनुष्य वाऊनि भेदन करी ।*
*त्यातें वरील राजकुमारी ।.......' (अ. ३९ . ८०)*

- म्हणजे मुक्तेश्वराच्या मनातही मुळात नसलेला 'मत्स्य' रुतून बसलेला आहे. मात्र तो स्वतःचा हा चकवा लक्षात न घेता महाभारताला सोडून वर्णन करणाऱ्या मराठी कवींवर टीका करताना म्हणतो,

*'प्राकृतकवींचा वाग्जल्प । तैलकराहीं पाहून रूप ।*
*फिरत मछाचा संकल्प । वामनेत्र विंधावा ॥*
*परि तें मूळ भारतीं नाहीं । म्हणोनि असो न बोलो कांहीं ।*
*नळिकाछिद्रांतूनि पाहीं । यंत्र भेदूनि पाडिलें ॥*

*(४१ . ७२ व ७३)*

- मुक्तेश्वराने टीका केलेले हे 'प्राकृत कवी' कोण? डॉ. र.बा. मंचरकर विष्णुदास नामा, कथाकल्पतरूकर्ता मधुकर व कृष्णदास दामा यांचा उल्लेख करतात. (मुक्तेश्वरांची कविता - खंड ३ - पृ. ९३)

यांतील 'कृष्णदास दामा'चे आदिपर्व प्रथम पाहू या.

श्री. ज.शा. देशपांडे संपादित 'प्राचीन मराठी कविता' - खंड ८ मध्ये 'कृष्णदास दामा' विरचित ओवीबद्ध 'आदिपर्व' संग्रहीत केलेले आहे. श्री. देशपांडे यांच्या मते हा कवी इ.स. १५०० ते १५५० मध्ये होऊन गेला असावा. मूळ महाभारतकथा सांगताना कृष्णदासाने भरपूर स्वातंत्र्य घेतले आहे. शिवाय अनेक कथा नव्यानेही गुंफल्या आहेत. यामध्ये आपल्याला प्रस्तुत असलेली द्रौपदीस्वयंवराची हकीगत प्रसंग २८ व २९ मध्ये येते. प्रसंग २८ ओव्या ७० ते ७८ मध्ये या स्वयंवरासाठी लावल्या गेलेल्या पणाचा तपशील येतो, तो असा -

*'यागशाळें प्रदेसीं । स्तंभ उभविला आकाशीं ।*
*सवा योजन तयासी । उंची असे ॥ ७० ॥*

*तयाचीये माथां पाहे । येक चक्र केलें आहे ।*
*तयावरी मीन पाहे । काष्ठाचा घातला ॥ ७१ ॥*
*तो मीन चक्रासहित । सव्यअपसव्य असे फीरत ।*
*पातया पातें जंव लागत । तंव सहस्र फेर तयाचा ॥ ७२ ॥*
*..... ऐसे यंत्र पाहे । कृष्णें साधिलें आहे ।*
*तयाखालें पाहे । केलें असे चुलवण ॥ ७४ ॥*
*कढें ठेविली तयावरी । तेल घातलें भीतरीं ।*
*जाळ लाविलीया वरी । तेला उसळु येत असे ॥ ७५ ॥*
*रूप तयांत पाहिजे । वरील मासा बिंधीजे ।*
*तेथील परीसीजे । परी गा राया ॥ ७६ ॥*
*डावी या डोळी यांतील बाहुली । जो कां विंधोन पाडील खालीं ।*
*माळ द्रुपदी तया घाली । अर्ध राज्य आंदणें ॥ ७७ ॥*

- या कवीने या मत्स्ययंत्राचे कर्तृत्व कृष्णाकडे दिले आहे. एवढ्यावरच तो थांबत नाही. ज्या वीराला ह्या फिरत्या मत्स्ययंत्राचा वेध घेणे जमणार नाही त्याला त्याच तेलाच्या कढईत टाकण्याची धमकी आहे. (ओवी क्र. ७८) आणि पुढे प्रसंग २९ मध्ये दुर्योधनाला मत्स्यभेद करणे न जमल्यामुळे द्रुपदाच्या सेवकांनी त्याला उचलून तेलाच्या कढईत टाकण्याचाही प्रयत्न केल्याचे वर्णन कवी करतो. पुढे कृष्णाने त्याला जीवदान दिल्याचेही तो सांगतो. (प्रसंग २९ ओव्या ८७ ते ९४)

- 'प्राकृतकवींचा वाग्जल्प' हा असा आहे. आता 'कथाकल्पतरू' मधील वर्णन पाहू.

'कथाकल्पतरू' या प्रचंड ओवीबद्ध ग्रंथाचे कर्ते दोन - त्यांपैकी एक कृष्ण याज्ञवल्की. हे एकनाथांचे समकालीन. यांनी या ग्रंथाचा सात स्तबकांचा पूर्वार्ध लिहिला. ग्रंथाचा उत्तरार्धही सात स्तबकांचा असून तो त्यांच्या शिष्याने - मधुकरकवीने इ.स. १६२३ मध्ये पूर्ण केला. डॉ. मंचरकरांनी या ग्रंथाच्या गद्य रूपांतराचा उल्लेख केला आहे. हे रूपांतर यंदे मंडळीने प्रकाशित केलेले आहे. माझ्यासमोर आत्ता संदर्भासाठी तेच रूपांतर आहे.

आता या ग्रंथामध्ये द्रौपदीस्वयंवराची कथा दोन वेळा येते. पूर्वार्ध - स्तबक ५ मध्ये व उत्तरार्ध स्तबक ८ मध्ये. मौज अशी की या दोन ठिकाणच्या तपशिलांमध्ये बराच फरक आहे.

डॉ. ना. गो. नांदापूरकर 'मुक्तमयूरांची महाभारते' (१९५६) या ग्रंथात

म्हणतात, 'मुक्तेश्वरी पणवर्णन कथाकल्पतरू, स्तबक ५ प्रमाणे आहे.' (पृ. ५४ पादटीप) डॉ. नांदापूरकरांचे म्हणणे तपासले पाहिजे. त्यासाठी त्यांनी उल्लेखिलेला स्तबक ५ मधील कथाभाग पाहू. तो असा आहे - 'मंडपाच्या मध्यभागी मत्स्ययंत्र तयार करून ठेविले. मंडपाच्या छताला दोरीने एक मासा बांधला होता; त्याच्या खालच्या बाजूस भोक असलेली एक फळी लावलेली होती. नंतर धृष्टद्युम्नाने एक धनुष्य व पाच बाण तेथे ठेवून, 'जो हे धनुष्य घेऊन जमिनीकडे पाहून वर फळीच्या भोकातून बाण सोडून माशाला खाली पाडील, त्यालाच द्रौपदी माळ घालील' असे सर्वांना सांगितले. (पूर्वार्ध ५.१३)

- मुक्तेश्वराने वर्णिलेले 'अवक्र नळुकायंत्र' (पूर्वोक्त ४१.७१) कथाकल्पतरूमधील या वर्णनाच्या अनुकरणातून आले असावे, असा नांदापूरकरांचा तर्क दिसतो. मात्र दोन्ही ठिकाणी तपशिलाचा फरक आहे.

- आता 'कथाकल्पतरू' उत्तरार्ध (स्तबक ८) मधील वर्णन पाहू. याचा कर्ता मधुकर कवी सांगतो, '(द्रुपद) राजाने एक मत्स्ययंत्र तयार केले. त्या मत्स्याचा नेत्र तैलकढईत पाहून जो फोडील, त्यास द्रौपदी द्यावयाची असा त्याने पण लावला.' (उत्तरार्ध ८.२६) कृष्णदास दामाने, 'ज्या वीराला अपयश येईल त्याला त्या तेलाच्या कढईत टाकण्याची' जी धमकी दिली होती तिचाही उल्लेख हा मधुकरकवी पुढे अ. २९ मध्ये करतो. येथेच दुर्योधनाने केलेल्या अपयशी प्रयत्नांचा उल्लेखही याने केला आहेच.

तेव्हा मुक्तेश्वराने उल्लेखिलेला 'प्राकृतकवींचा वाग्जल्प' कृष्णदास दामा व नंतर मधुकर कवीकडे अंगुलिनिर्देश करणारा आहे.

- श्रीधरांच्या 'पांडवप्रतापा'मध्ये (इ.स. १७१२) हा 'मत्स्य' आहेच. (१२.२१) आणि या ग्रंथाची लोकप्रियता लक्षात घेता अर्वाचीनांच्याही मनात येथूनच येऊन त्याने घर केल्याचा तर्क करता येईल.

- परंतु अशी घाई नको. पुन्हा एकदा संस्कृत पुराणांकडे जाऊ या. यांमध्ये 'भागवतपुराण' महत्त्वाचे. कारण त्यातील घटनांचे संस्कार जुन्यानव्या मराठी कवींवर अधिकांशाने आहेत.

भागवताच्या दशम स्कंधामध्ये अ. ८३ मध्ये एक प्रसंग आहे. द्रौपदी श्रीकृष्णाच्या अष्ट नायिकांना (रुक्मिणी, सत्यभामा, जांबवती, कालिंदी, भद्रा, नाग्नजिती वा सती, मित्रविंदा व लक्ष्मणा.) त्यांच्या त्यांच्या विवाहाची हकीगत विचारते. त्यांपैकी लक्ष्मणा म्हणते, 'हे द्रौपदी ज्याप्रमाणे तुझ्या स्वयंवराच्या वेळी

तुला अर्जुनच पती मिळावा या बुद्धीने <u>मत्स्ययंत्र</u> तयार केले होते, तसेच एक यंत्र माझ्या स्वयंवराच्या वेळी माझ्या पित्याने तयार करविले. मात्र त्यात भेद एवढाच होता की तुझ्या वेळचा मत्स्य बाहेरून झाकलेला (म्हणजे केवळ त्याच्याखाली उभे राहणाऱ्यासच दिसणारा) होता; तर माझ्या वेळचा मत्स्य प्रत्यक्षपणे कोठूनही दिसणारा नव्हता. मात्र त्याचे प्रतिबिंब पाण्यात दिसत होते.' (भागवत १०.८३.१९)

तेव्हा महाभारतातील 'लक्ष्य' येथे भागवतकारांनी 'मत्स्य' असे निश्चित केलेले दिसते.

लक्ष्मणेने आपल्या या स्वयंवराची हकीगत बरीच विस्ताराने सांगितली आहे. या स्वयंवरासाठी जरासंध, अंबष्ठ, शिशुपाल, भीम, दुर्योधन, कर्ण इ. अनेक राजे आले होते. त्यांना केवळ धनुष्याला दोरी लावणे जमले परंतु 'मत्स्य' कुठे दिसेना. अर्जुनाने मात्र मत्स्याचे पाण्यातील प्रतिबिंब पाहून बाण सोडला; परंतु तो केवळ माशाला चाटून गेला. शेवटी श्रीकृष्ण उठला व त्याने त्या माशाचे प्रतिबिंब फक्त एकदाच पाण्यात पाहून मत्स्याचा अचूक वेध घेतला. (१०.८३. २३ ते २६)

भागवतातील या हकीगतीत अन्य मनोरंजक तपशीलही बराच आहे. एक गोष्ट लक्षात येते - द्रौपदीस्वयंवराच्या वेळी अर्जुनाला जो लक्ष्यभेद जमला होता, तो येथे जमत नाही.

या प्रसंगाच्या मोरोपंती अनुवादात आणखी एक बारकावा आहे. हा संपूर्ण प्रसंग लक्ष्मणा प्रत्यक्ष द्रौपदीला सांगते आहे, हे लक्षात घेऊन पंत एक लक्षणीय वळण देतात. त्यांची लक्ष्मणा म्हणते,

*"रंगी श्रीकृष्णसख त्वत्प्रिय कृष्ण हि उठे महाभागे!*
*भागे, परि शर सोडी तो त्या मीनास वात-सा लागे.*
*श्रीकृष्णें, 'साधु! सखे! साधु!' असें म्हणुनि पोटिसीं धरिला.*
*अरि लाजले समस्तीं, स्तुतिकन्येनें तुसा चि पति वरिला."*

*(बृहदशम ८३.१८८-१८९)*

पंत सहसा विस्तार करीत नाहीत. परंतु या अध्यायात पात्रमुखी निवेदन करताना पंतांनी अशी पात्रसहज वळणे दिली आहेत.

मात्र पंत मूळ घटना कुठेही बदलीत नाहीत. त्यामुळे त्यांच्या भारतानुवादात द्रौपदीस्वयंवराच्या हकीगतीत मुळाप्रमाणे '<u>लक्ष्यभेद</u>'च आहे. (आर्याभारत आदि. अ. ३५) तर येथे भागवती अनुवादात 'मत्स्यभेद' आहे.

---

- असा हा भागवती कथेतील 'मत्स्य' सर्वांच्या मनी रुतला असावा काय? सांगणे अवघड आहे. एक गोष्ट नोंदवतो. भागवताच्या यंदे प्रतीच्या शेवटच्या भागात 'भारतीय पौराणिक कोश' समाविष्ट आहे. त्यात 'द्रौपदी'वरील टिपणात महाभारताच्या आदिपर्वाचा हवाला देऊन, 'हिंच्या स्वयंवरात मत्स्ययंत्राचा वेध करून अर्जुनाने हिला जिंकले.' असाच उल्लेख आहे. (पृ. १५१) म्हणजे कोशकारही भागवती कथेकडून महाभारताकडे वळलेले दिसतात.

- असा हा 'चकवा', सहचरीच्या शोधात त्याचे भ्रमण चालूच आहे. पण 'मत्स्या'चे काय?

- प्रस्तुत लेख लिहीत असताना माझ्या गुरूभगिनी डॉ. श्रीमती सिंधू डांगे यांचा 'The Bhāgavat Purāṇa (Mytho-Social Study)' - 1984 - हा ग्रंथ योगायोगाने पाहण्यात आला. त्यामध्ये 'अवतारा'विषयी लिहिंताना 'मत्स्यावतारा'च्या संदर्भात एकत्र केलेली काही माहिती भाष्याविना येथे देतो -

"जलप्रलयाच्या कथेत मत्स्याला मिळालेल्या महतीमागे काही निश्चित कार्यकारणभाव आहे.

विवाहाच्या चौथ्या दिवशी करण्यात येणाऱ्या धार्मिक विधींमध्ये मत्स्य अर्पण करणे हे फलद्रूप मानले जाते. मत्स्य हे विवाहसुखाचे प्रतीक मानले जाते, बौधायन गृह्यसूत्रानुसार या चौथ्या दिवशीच्या विधीमध्ये नवविवाहित दांपत्य गावाबाहेर जाऊन उंबराची पूजा करतात; त्याच्याकडे विवाहोत्तर सुखाची मागणी करतात. नवीन कापडामध्ये एक मासा पकडून तो जलविहगांना बळी म्हणून अर्पण केला जातो.

- बंगालमधील एका चालू रूढीत गृहप्रवेशाच्या वेळी नववधूच्या हाती एक जिवंत मासा ठेवला जातो....

- महाराष्ट्रात पायात करंगळीजवळच्या बोटात 'मासोळी' घालण्याची प्रथा आहे.

- मदन हा मीनकेतू, मीनकेतन आहे. मत्स्याच्या पोटातून जन्मलेली मत्स्यगंधा भारतातील राजकुलाची माता आहे.

- प्राचीन इजिप्शियन कथांत 'Osiris' व त्याची पत्नी 'Isis' यांची कथा आहे. 'ओसिरिस्' मारला गेला. त्याचे शरीर 'इसिस्'ला सापडले तेव्हा त्याचे लिंग माशाने गिळलेले होते. मासा हे पुरूषलिंगाचे प्रतीक असल्याचे सुचविले जाते.

- द्रौपदीस्वयंवराच्या वेळी अर्जुनाने मत्स्यभेद केला याचा प्रतीकात्मक अर्थ यावरूनच उलगडण्याची शक्यता आहे." (पृ. २२६)

- "इति श्रीचकवापुराणे मत्स्यखण्डे मिथकशोधन" नाम अंतिमोऽ ध्यायः ।"

■

**मु. व पोस्ट - चौल, ता. अलिबाग, जि. रायगड ४०२ २०३.**

**सूचना फलक**

## पत्रिकेबद्दल वार्षिक निवेदन

'मराठी अभ्यास परिषद पत्रिका' या नियतकालिकाची मालकी व इतर बाबी यांच्या संबंधी वृत्तपत्रे आणि पुस्तकनोंदणी अधिनियम कलम डी १९ (बी) आणि वृत्तपत्रे नोंदणी (केंद्रीय) नियमावली १९५६, नियम ८, नमुना ४, यांना अनुसरून केलेले निवेदन.

१) **प्रकाशन स्थळ :** पुणे, महाराष्ट्र

२) **प्रकाशनाची कालनियतता :** त्रैमासिक, जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर.

३) **मुद्रकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता :** नीलिमा गुंडी, भारतीय, पत्ता : ३, अन्नपूर्णा १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५, वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे - ४११ ००२.

४) **मुद्रणस्थळ :** पद्मरेखा आर्ट्स, १९४/२ नवी पेठ, पुणे - ४११ ०३०.

५) **प्रकाशकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता :** नीलिमा गुंडी, भारतीय, कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद, पत्ता : कलम ३ प्रमाणे

६) **संपादकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता :** मृणालिनी शहा, भारतीय, पत्ता : १ शीतल अपार्टमेंट, ४६/४ एरंडवणा, पुणे - ४११ ००४.

मी नीलिमा गुंडी असे प्रतिज्ञापूर्वक सांगते की, वर दिलेला तपशील माझ्या माहिती आणि समजुतीप्रमाणे खरा आहे.

**नीलिमा गुंडी**
**प्रकाशक**








राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



मराठी अभ्यास परिषद

# "मी आणि अहिराणी" भाषिक अंगाने परिचय

सुधीर रा. देवरे

मातृभाषा - माझी मातृभाषा अहिराणी आहे आणि मराठी ही माझी शैक्षणिक भाषा. माझे वडील प्राथमिक शिक्षक होते. तरीही घरी आल्यावर आमच्याशी ते अहिराणीत बोलत. म्हणून अगदी लहानपणापासून मातृभाषा अहिराणी भाषेबद्दल माझ्या मनात कोणताही न्यूनगंड नाही. आज माझी सर्व भावंडे शिक्षक आहेत. त्यांच्यासोबत व माझ्याबरोबर कोणी बुजुर्ग असले तरी आम्ही आपसात अहिराणी बोलतो. कारण अहिराणीत बोलल्याशिवाय आमच्या संवादात ओलावा येणार नाही, संवाद पूर्ण होणार नाही, हे आम्ही आतून जाणून असतो.

मात्र माझ्या मुलीची मातृभाषा अहिराणी नाही. तिची मातृभाषा मराठी आहे. याचा अर्थ तिला अहिराणी कळत नाही, असे नाही. या अहिराणी भागात असे अनेक लोकही आहेत की त्यांची मातृभाषा अहिराणी नाही पण ते चांगल्या सफाईदारपणे अहिराणी बोलतात. व्यवहारही अहिराणीत करतात. मातृभाषा वेगळी असूनही परकीय भाषेत दैनंदिन व्यवहार करतानाची अनेक उदाहरणे सर्वत्र पहायला मिळतात. मातृभाषा वेगळी, संवाद भाषा वेगळी, शैक्षणिक भाषा पुन्हा वेगळी असा हा सर्व गोंधळ टाळण्यासाठी मातृभाषेची व्याख्या करणे रास्त ठरेल.

"लहान मुलाशी आपली आई जी भाषा बोलते आणि त्याच भाषेत मूल आईला जो प्रथम प्रतिसाद देते ती त्या मुलाची मातृभाषा." अशी मातृभाषेची व्याख्या केली तर अहिराणी ही माझी मातृभाषा ठरते तर माझ्या मुलीची मातृभाषा मराठी असल्याचे स्पष्ट होते. माझ्या मुलीला जर माझ्या आईने अहिराणीत सांगितले,

"बापुले सांगी दे, माले आज विरगावले जानं शे"

तर मुलगी येऊन मला मराठीत सांगते,

"बापू, ताई म्हणते, आज ताईला विरगावला जायचं आहे."

असं परस्पर अहिराणीतून मराठीत भाषांतर करण्याचं कसब तिच्यात उत्पन्न होण्याचं कारण तिची मातृभाषा मराठी असणं हे आहे. एखादा अडाणी अहिराणी मातृभाषकही निरोप अस्सल अहिराणीत स्वतःला न कळत भाषांतरित करतो ते यामुळेच.

जनगणनेचा अर्ज अथवा इतर कोणत्याही अर्जातील माहिती भरताना मातृभाषा या सदरासमोर अहिराणी मातृभाषक लोक आपल्या मराठी शैक्षणिक भाषेमुळे 'मराठी' असे लिहितो, ते यामुळेच चूक ठरते. कारण मराठी ह्या शैक्षणिक भाषेमुळे तो सर्व व्यवहार आजच्या घडीला मराठीत करत असला तरी त्याची मातृभाषा 'अहिराणी' असते. म्हणून मातृभाषा सदरासमोर त्याची जी काही अहिराणीसारखी मातृभाषा असेल तिचा उल्लेख करणे आवश्यक ठरते.

**लोककलांच्या सहवासात -**

लहानपणी आमच्या विरगाव या गावी सर्वत्र अहिराणी संस्कृती नांदत होती. आज तशी ती राहिली नाही. शाळेबाहेरही सर्वत्र वेगळे अनुभव मिळत होते. ती ही आमची एक मुक्त शाळाच होती. लोककलांमध्ये खूप रस वाटायचा. सांबळ, डफ, खंजिरी, थाळी, बार, झोके, टिंगरीवाले, नंदीबैलवाले, कानबाई, आया, वीरदेव, डोंगऱ्यादेव, गोंधळी, भोप्या (वासुदेव), आढीजागरण, भोवाडा, रायरंग हे सर्व वेगळेच विश्व होते आणि ह्या विश्वात संमोहित करण्याइतकी ताकद होती. सर्व प्रकारची अहिराणी लोकगीते तोंडपाठ असायची. दुसरी-तिसरीत असतानाच एकदा माझ्या मित्राने आमच्या वर्गशिक्षिकेला सांगितले,

"बाई सुधीरला मस्त गाणे येतात."

बाईंनी आग्रह केला म्हणून मी गाणं म्हटलं. मग बाई म्हणाल्या, "आता पंधरा ऑगस्ट जवळ आला, त्या दिवशी तू हे गाणं म्हण."

पंधरा ऑगस्टच्या दिवशी बाईंनी माझ्या दत्तू नावाच्या मित्राला साडी नेसवली. सर्व मराठी शाळकरी मुलं, हायस्कूलची मुलं, दोन्ही शाळांचे शिक्षक, काही गावकरी समोर बसलेले. शाळेच्या ओट्यावर मी आणि माझ्या शेजारी दत्तू नावाचा साडी नेसलेला मुलगा, जो माझ्यापेक्षा बराच उंच होता. मी गाणं म्हणायला सुरूवात केली.

"मन्ही ठमीनं लगीन वऱ्हाडी कोन कोन
मामा म्हणे मी मामा

आनि ल्गनात बिन कामा
मन्ही ठमीनं लगीन वऱ्हाडी कोन कोन
मामी म्हणे मी मामी,
ल्गनात बिन कामी
मन्ही ठमीनं लगीन वऱ्हाडी कोन कोन
चुलता म्हने मी चुलता
आनि लगनात पडे उलथा-पालथा
मन्ही ठमीनं लगीन वऱ्हाडी कोन कोन
चुलती म्हने मी चुलती
लगनात पडे उलथी-पालथी
मन्ही ठमीनं लगीन वऱ्हाडी कोन कोन
आजा म्हने मी आजा
आनि लगनात डोकं खाजा
मन्ही ठमीनं लगीन वऱ्हाडी कोन कोन
बाप म्हने मी बाप
आनि लगनात लागे धाप
मन्ही ठमीनं लगीन वऱ्हाडी कोन कोन

समोरून खूप हशा पिकत होता. मला खूप गाणी येतात, याचा सर्व गावभर बोलबाला झाला. तेव्हापासून दोन-चार वर्षे गावात एखाद्या मुलीचं लग्न असलं की मला माईकरूममध्ये नेलं जात असे आणि तिथे माझं गाणं म्हणायचं ठरलेलं असे. त्या दोन-चार वर्षांत मी बऱ्याच नवऱ्या मुलींना 'ठमी' करून टाकलं होतं.

**मातृभाषा लपवणे - हास्यास्पद -**

लहानपणी शाळेतल्या शिक्षकांशी बोलतानाच फक्त आमचा मराठीशी संबंध येत असे. एरवी मित्रांशी शाळेत बोलतानाही आम्ही सर्रास अहिराणीत बोलत असू. कारण अहिराणी ही आमची नैसर्गिक मातृभाषा होती. जे काही शिक्षक आमच्या भागातील अहिराणी परिसरातीलच असत तेही आपसात अहिराणीतूच बोलत. म्हणून भाषातज्ज्ञांचे भाषाशास्त्र वाचण्याआधीपासून अहिराणी बोलण्याबाबत मला आजपर्यंत कधीही कमीपणा वाटला नाही, व मनात न्यूनगंड उत्पन्न होण्याचीही घटना घडली नाही. घरात एखादा बिगर अहिराणी भाषक पाहुणा असला तरी त्याच्याशी बोलताना मराठी आणि तो समोर असतानाच कुटुंबातील सदस्यांशी

अहिराणी, अशा दोन्ही भाषा सहज बोलल्या जात.

एकदा आम्ही एका शिक्षकाच्या घरी बसलो होतो. कशासाठी ते सांगता नाही येणार. पण कदाचित ती लादलेली शिकवणीही असेल. तेव्हा तिथे एक शेजारची बाई आली. आमच्या शिक्षकाची पत्नी स्वयंपाक करत असावी. ती शेजारीण म्हणाली, "का वो बाई, सैपाक चालना का? आत्ताशी काबरं?" तेवढ्यात शिक्षकाची बाई म्हणाली,

"अवो या पोरांनी <u>बठ्ठा</u> संयपाक नासवून टाकला. त्यांच्यासाठी येवढं <u>सुदीक</u> ठेवलं नाही."

शिक्षकाची पत्नी अल्पशिक्षित असावी. तिची मातृभाषा अहिराणी होती. मात्र शिक्षकाच्या पत्नीचा न्यूनगंड म्हणून अहिराणी कसे बोलावे, अशा मानसिकतेतून ती मराठी बोलण्याचा केविलवाणा प्रयत्न करत होती आणि साहजिकच मिश्र भाषेमुळे ती वेळोवेळी हास्यास्पद ठरत होती.

**नैसर्गिक भाषा -**

विरगाव ते सटाणा अवघे दहा किलोमीटर अंतर. परंतु आम्ही शाळेत होतो तेव्हा क्वचित कोणी सटाण्याला जात असे. दळणवळण खूप नव्हते. अशातच कोणी शालेय विद्यार्थी काही कामानिमित्ताने कोणाबरोबर सटाण्याला गेलाच तर तो तिकडून सिनेमाही पाहून येत असे. सिनेमा पाहून आल्यावर शाळेच्या मधल्या सुट्टीत सर्व मित्रांना 'स्टोरी' सांगायचा कार्यक्रम होत असे. त्यामुळे स्टोरी सांगणाऱ्याचा आनंदही द्विगुणित व्हायचा. तेव्हाही सिनेमाच्या स्टोरीला 'स्टोरी'च म्हणत. अहिराणी भाषेत त्याचे जास्तीत जास्त रूपांतर 'टोरी' होत असे.

आमचा काळू नावाचा मित्र असाच एकदा सटाण्याहून सिनेमा पाहून आला आणि मधल्या सुट्टीत ग्राऊंडवर स्टोरी सांगत होता. आम्ही तिथपर्यंत गेलो तेव्हा त्याची स्टोरी सुरू झालेली होती. आम्ही विचारलं, "काय चाललं?"

"काळू सिनेमाची स्टोरी सांगतोय. ऐक ना - सांग रे काळू पुढे......."

एकजण म्हणाला. मग काळूने पुन्हा पुढची स्टोरी सांगायला सुरूवात केली.

".......त्या रस्तावर मंग धर्मेंद्र उभा राह्यना. तवश्यात तथाहून डॅनी वना भो. डॅनीनी धर्मेंद्रले पाह्य आनि त्यानी तळपायनी आग मस्तकले भिडनी. तो धर्मेंद्रले म्हने, "काय रे ये भडवाना. तुले आठे मी येवाले नही सांगं व्हतं ना. तुले काही काम-धंदा नही का? भिकारीनागत उभा ऱ्हायना ते."

मंग धर्मेंद्र त्याले म्हने, "नीट तोंड सांभाळीसन बोल बरका तू. जरासा

सुद्दीमा बोल."

डॅर्नी म्हने, "मंग काय करी घीशी तू?"

आता धर्मेंद्रले गया भो पेच पडी. आता काय करवा? तवश्यात धर्मेंद्रले तिकून हेमामालिनी येताना दिसनी. मंग धर्मेंद्रन्या बाह्या फुरफुरन्यात. डॅनीवर धायी जात तो म्हने, "काय करी घीशी ना, मंग तुले आता दखाडंसच थांब" तवशी हेमामालिनीनी जवळ यीसन धर्मेंद्रले धरी घीदं. ती धर्मेंद्रले म्हने, "जाऊ दे रे भो. त्यानं मांगे काय लागस?"

एवढ्यात कोणीतरी विचारले, "कोणता सिनेमा पाहिला?"

काळू म्हणाला, "चित्रा"

सर्व मुलं हसली. 'चित्रा' हे सटाण्यातील थिएटरचं नाव होतं. अजूनही ते आहे.

अजून कोणीतरी म्हणालं, "काळू, पिक्चर अहिराणीमा व्हता का रे?" स्टोरीत गुंग झालेला एकजण म्हणाला, "गप्प बसा रे, सांग रे भो काळू. पुढे काय जयं मंग?"

अशी होती काळूची हिंदी सिनेमाची स्टोरी. ही स्टोरी सांगतांना त्याचे डोळे लकाकत होते. भाषेची त्याला कुठेच अडचण येत नव्हती.

भाषा सर्वचजण बोलतात. एकच भाषा व्यक्तींपरत्वे बदलत जाते. एकच भाषा वेगवेगळ्या ढंगात आपल्याला ऐकायला मिळते. काहीजण नैसर्गिक भाषा बोलतात, काही कृत्रिम भाषा बोलतात, काही जाणीवपूर्वक कमावलेली भाषा बोलतात. काही लोक सौष्ठवपूर्ण भाषा बोलतात. पण काळूची भाषा ही सहज नैसर्गिक भाषा होती. अजूनही काळू विरगावला आहे. शेती करतो आणि रात्रंदिवस अशीच सहज नैसर्गिक अहिराणी भाषा त्याच्या जीभेवर नाचत असते.

काळू अस्सल अहिराणीमध्ये स्टोरी सांगत होता आणि त्याच्या प्रत्येक वाक्यागणिक आम्ही पोट धरून हसत होतो. कारण हिंदी सिनेमाची स्टोरी तो नुसता अहिराणीत सांगत नव्हता. आक्खा सिनेमा तो त्याच्या स्वतःच्या भाषेतून सांगत होता. भावनांचाही अनुवाद करत होता. हिंदीतली शिवी अहिराणीत कशी होईल याचे प्रात्यक्षिकही काळूने करून दाखविले होते. तरीही त्याच्या दृष्टिकोनातून आपण खूप महत्त्वपूर्ण असे भाषांतर करीत आहोत याचा त्याला कसलाही गंध नव्हता. आपण भाषेच्या संदर्भात बोलता-बोलता किती मोठे काम करीत आहोत याचा त्याच्याबरोबरच ऐकणाऱ्यांनाही थांगपत्ता नव्हता. एवढ्या लहान वयातही

अहिराणीचे सौष्ठव पाहून माझे डोळे त्यावेळीही चमकले होते.

**'लऊन' आणि 'माय' -**

भाषेच्या या सवयीमुळे अनेक प्रसंगनिष्ठ विनोद घडायचे. घरी अहिराणीत बोलण्याची सवय. मित्रांबरोबर अहिराणी. दुकानदाराशी म्हणजेच व्यवहारात अहिराणी. शाळेत शिक्षक येईपर्यंतही आपसात आम्ही मुलं अहिराणीतच बोलत असू. इतकेच काय काही अहिराणी भाषक शिक्षकही अधून-मधून अहिराणी बोलत. त्यामुळे शिक्षकांशी बोलतांना प्रासंगिक विनोदाच्या घटना नियमित घडत रहायच्या. उदाहरणार्थ, अहिराणीत 'लई ये' या शब्दाला मराठीत 'घेऊन ये' असे म्हटले जाते. शाळेत शिक्षकांनी, 'निबंधाची वही आणली का?' असे विचारले तर काही मुले अहिराणीच्या सवयीतून सहज म्हणून जात.

"उद्या लऊन येऊ का सर?" शिक्षक अहिराणी भाषक असले की चटकन उत्तर देत, "लऊन कशाला येतो? ताठच ये." 'लवणे' या अहिराणी शब्दाचा मराठीत अर्थ होतो 'वाकणे.' परंतु अहिराणीतला 'लई' मराठीत 'घेऊन' होतो. भाषेच्या गोंधळामुळे मुले 'लऊन' ('लई'तला ल आणि 'घेऊन' मधला 'ऊन' एकत्र करून 'लऊन' असे म्हणतात.) हा गोंधळ इकडच्या प्राथमिक / माध्यमिक शाळेत नेहमीच होताना दिसतो. याकडे शिक्षकांसह पालकही विनोदाने पाहत असले तरी भाषिकदृष्टया सजग असणाऱ्या अभ्यासकाने गांभीर्याने पाहण्याची गरज आहे. अहिराणीतले प्रथम अक्षर घेऊन त्याला मराठीतल्या त्या अर्थाच्या संज्ञेची बाकी अक्षरे प्रत्ययासारखे लावून नवीन शब्द तयार केला जातो. ज्या वस्तूंसाठी मराठीत आणि अहिराणीत भिन्न संज्ञा आहेत, त्यांच्या बाबतीत अहिराणी मातृभाषक मुलांकडून असे प्रत्यय त्यांच्याही नकळत असेच लावले जातात. असा भाषिक अभ्यास शालेय अभ्यासक्रमात समाविष्ट केला तर याकडे विद्यार्थी गांभीर्याने पाहतील आणि विनोदामुळे न्यूनगंडही कमी होण्यास मदत होऊ शकेल. प्रमाणभाषेची आवडही यामुळेच विद्यार्थ्यांत निर्माण होऊ शकेल.

अहिराणीत आईला 'माय' म्हणतात. मराठीतल्या इतर बोलींमध्येही 'माय' हे संबोधन आईसाठी वापरले जात असल्याचे सर्वांना माहित आहे. या शब्दामुळेही अहिराणी पट्ट्यात विनोद होताना दिसतात. वर्गात इंग्रजीचे शिक्षक शिकवीत होते. is म्हणजे आहे. He म्हणजे तो. She म्हणजे ती. are म्हणजे आहेत. My म्हणजे माझ्या वगैरे. देवमन नावाच्या विद्यार्थ्याचे लक्ष नाही असे शिक्षकांच्या लक्षात येताच शिक्षकांनी देवमनला विचारले, 'देवमन, उभा रहा.'

देवमन दचकून उभा राहिला. शिक्षक म्हणाले,

'सांग My म्हणजे काय?'

देवमन क्षणाचाही विलंब न करता म्हणाला, 'आई'

एकच उच्चाराचा शब्द दोन वेगवेगळ्या भाषेत येत असला की ते विद्यार्थ्यांचा गोंधळ उडवून देतात. या गोष्टीवरही विनोदाचा भाग म्हणून पांघरूण घालण्यापेक्षा ते डोळसपणे शालेय अभ्यासक्रमात समाविष्ट करता येऊ शकेल. त्या त्या भौगोलिक परिसरातील संपर्क भाषांचा अभ्यास स्थानिक पातळीवर राबवता येईल.

**'शुद्ध'तेचा शिष्टपणा -**

'शेवया' पदार्थाला बागलाणी अहिराणीत 'शेवाळ्या' असे म्हणतात. तर जळगावच्या अहिराणीत 'शेवाया' असे म्हणतात. या शब्दावरून एक शिक्षक माझ्या वर्गातील एका मुलाला जे टोचून बोलले ते मला त्या वयातही खटकले होते. चित्रकलेचे एक शिक्षक मुलांना 'काय खाल्ले?' असे अधून-मधून विचारायचे. त्यांना तशी ती सवय झालेली होती. असेच त्यांनी आमच्या वर्गात एकाला विचारले. त्या विद्यार्थ्याने सांगितले,

'शेवाळ्या खाल्ल्या.'

त्याच्या त्या उत्तराने आम्हाला कोणालाच काही वावगं वाटलं नाही. पण सर मुद्दाम वाकडे तोंड करत म्हणाले,

"शेवाळ्या? शेवाळ्या काय शेवाळ्या? तुला शेवया असं म्हणता येत नाही का? गाढवासारखा अशुद्ध बोलतोस. जरा शुद्ध बोलायला शिक." असा त्यांनी टोला मारला. हा मला सरांचा शिष्टपणा वाटला. खरे तर हे शिक्षकही अहिराणी भाषकच आणि शिक्षक होईपर्यंतही त्यांनी 'शेवया' ना 'शेवाळ्या'च म्हटलं असेल. पण आज ते हिंसकपणे विद्यार्थ्यांच्या उण्यादुण्या काढत होते. बरं ही गोष्ट एवढ्यावरच थांबली असती तर आज ती आठवलीही नसती. त्या मुलाला त्या शिक्षकांनी कायमचे 'शेवाळ्या' असे नाव ठेवले. हा क्रूरपणा आहे, हे त्यांच्या ध्यानीमनीही नव्हते.

**मराठी भाषा - टीका आणि प्रतिष्ठा -**

लहानपणी संवाद - व्यवहाराची भाषा पूर्णपणे अहिराणी असल्यामुळे आणि शाळेत शिक्षकांशी मराठी भाषा बोलावी लागते म्हणून मराठीकडे एक दबदब्याची - प्रतिष्ठेची भाषा असा दृष्टिकोन तयार होत होता. मराठी ही एक सार्वत्रिक - म्हणजे आताच्या शब्दात जागतिक भाषा असावी असे मनावर पक्के बिंबायला लागले होते.

(दुर्दैवाने तसे नाही हे खूप उशीरा कळले.) मराठी ही एक प्रतिष्ठित भाषा असे समीकरण मनात तयार व्हायला काही तत्कालीन कारणेही प्रभावी ठरत होती. उदाहरणार्थ, गावातील कोणाची तरी नुकतीच लग्न होऊन आलेली सून शहरातली असल्यामुळे इतर स्त्रियांशी मराठीत बोलत असावी. तिच्याबद्दलची चर्चा कानावर पडली.

एक स्त्री : 'ती तुळसाबोयनी हू भयानश्यानी शे वं माय'

दुसरी स्त्री : 'कायवं काय जयं?'

'मायवं ती घरात सासू-सासरासंगे बी मराठीच बोलंस'

'मराठीमा बोलंस?'

'हाव ना माय'

'तिन्हं माहेर निफाडनं शे. म्हणून बोलत व्हयी वं.'

'माहेर निफाडनं राहो का मुंबईनं राहो. आपला नवरा शेतकरी. सासू-सासरा मजूरी करतंस. तिन्ही मराठीमा बोलवा का? तिले हाई शोभस का? लोक काय म्हनतील यानं ते भान ठेवा तीन्ही.'

'तिले अहिराणी बोलता येत नशे ते, ती काय करई मंग?'

'मंग, येत नशे म्हने? अहिराणी शिकाले कायी शाळात जानं पडंस का?'

मराठी भाषेत असलेल्या स्त्रियांबद्दल विरगावला नेहमी अशी निंदा ऐकायला मिळायची आणि बहुत करून ती ही स्त्रियांकडूनच. मराठी बोलणाऱ्या स्त्रीला अथवा तरूण मुलीला शिष्ट समजले जात होते. ती स्त्री इतर स्त्रियांच्या चर्चेचा विषय होत होती.

पुरूषांच्या बाबतीतही असाच अनुभव असला तरी त्या टीकेची धार मात्र थोडी बोथट रहात असे.

"आपली भाशा काय आपू इसरतंस का? दोन दिवस नाशिकले राही वना ते लागना मराठी बोलाले. नुसता भास मारस, दुसरं काय?" अशा पद्धतीची समवयस्क मित्रांकडून टीका होत असली तरी काही प्रमाणात तो कौतुकाचाही विषय व्हायचा. विशेषतः स्त्रियांकडून अशा तरुणाचे कौतुक व्हायचे. उदाहरणार्थ, अजून एक कानावर पडलेला संवाद :

"तो मोठाभाऊना पभा भयान हुशार व्हयी गया म्हने! तो आता नाशिकले शिकाले शे. तो मराठीमा बोला लागा बरं! कालर्दीस दुकानमा गऊ. तधळ तो माले वट्टावर हुभा दखायना. त्याले म्हनतं, "पभा कधळ वना रे भाऊ?'

तवश्यात तो म्हने,

"काल आलो!'

अशा काही अनुभवांमुळे तत्कालीन समाज मराठी भाषेकडे आदराने आणि न्यूनगंडानेही पहात होता असे लक्षात येते. मराठीबद्दल त्याला आदरयुक्त उत्सुकता होती, आणि परंपरेने आपण जी भाषा बोलतो ती भाषा टाकून देणाऱ्याला तत्कालीन समाज टीकेचा विषयही करीत होता. नक्की निर्णय घेण्याची मर्यादा आणि निवड करण्याची क्षमता अशिक्षितपणामुळे त्याच्यात नव्हती. त्यामुळे भाषेच्या बाबतीत त्यांच्या मनात गोंधळाची भावना निर्माण झाली होती. शैक्षणिक भाषा मराठी असल्याने तिच्या विरुद्ध प्रखरता ही दिसून येत नव्हती. सारांश, तत्कालीन समाजात गोंधळामुळे आणि निर्णयक्षमतेच्या अभावामुळे का होईना द्विभार्षी समजुतदारपणा पहायला मिळत होता. लादलेल्या भाषेलाही तो सहिष्णुता दाखवत होता.

**हिंदी - दळभद्री भाषा - एक समज -**

मराठी ही जशी एक प्रतिष्ठेची भाषा म्हणून मनात ठसली होती, तिच्या उलट परिस्थिती हिंदीची होती. गावात दोन-तीन मुस्लिम कुटुंब होती. त्यांची आर्थिक परिस्थितीही खूप हलाखीची होती. आर्थिक परिस्थिती खरं तर आक्ख्या गावाचीच फाटक्या आभाळासारखी होती. आमची अवस्था तर इतरांपेक्षा बिकटच होती. परंतु अस्वच्छ रहाणारे लोक हिंदी बोलतात, हे मनावर ठसले होते. ऊस तोडणी करणारे मजूर, पाटस्थळ राखण करणारा भैय्या, स्टो रिपेअर करून देणारे, फेरीवाले, भंगारवाले, पेटीवाले, दोम दोमवाले, भिक्षेकरी, कुल्फीवाले हे सर्व लोक हिंदी बोलत आणि या हिंदीत तसा अजिबात गोडवा नसायचा. कानांना अतिशय ठेचकळणारी ही भाषा आपलीशी वाटत नव्हती. तिच्यात कुठलेही सौष्ठव वा सौंदर्य दिसत नव्हते. म्हणून हिंदी ही एक दळभद्री भाषा आहे असा कुठेतरी माझा नकळत समज झालेला होता. हिंदीबद्दल माझ्या मनात अढी निर्माण झाली होती. ती प्रतिष्ठेची भाषा होऊच शकत नाही अशी मी नेणिवेत नोंद करून ठेवली होती. कोणी अहिराणी माणूस हिंदी बोलणाऱ्याशीही काम-चलाऊ हिंदी बोलत. ते नुसते हास्यास्पदच नव्हे तर मला किळसवाणेही वाटायचे. उदाहरणार्थ, एखाद्या हिंदी बोलणाऱ्याशी अहिराणी बोलणारा म्हणायचा, "उनको सांगो, मै संध्याकाळी आता हूं."

आमच्या शाळेत पठाण नावाचा माझा मित्र होता. तो आमच्यात इतका

मिसळला होता की अहिराणीच बोलायचा. घरी कुटुंबातील व्यक्तींशी बोलताना आमच्यामुळे त्याची हिंदी बिघडून गेली होती. तो अहिराणी - हिंदी अशी मिश्र भाषा बोलायचा. एकदा तो आम्हाला म्हणाला, "माझ्या हिंदीला आता आमच्या घरातही हसायला लागलेत. काल मी म्हणालो, 'मैं अभी चप्पल सांधके आता हूँ.' तर घरात सर्व हसायला लागले."

मराठी प्रतिष्ठित आणि हिंदी घृणास्पद असे समीकरण माझ्या मनात पक्के तयार झाले होते. नाहीतरी शाळेतही एका विषयापुरते हिंदी. पण हिंदीतल्या अशा प्रॅक्टिकल अनुभवांमुळे मी हिंदीत रस घेतला नव्हता.

अशा पार्श्वभूमीवर दहावीनंतर ओझर येथील एच.ए.एल. ला टेक्निकल म्हणून माझी निवड झाली होती. आमचे ट्रेनिंग मॅनेजर होते परमार नावाचे शीख गृहस्थ. हिंदुस्थान एरोनॉटिक्स लिमिटेड या मिग विमानांच्या कारखान्यात सर्व हिन्दुस्थानी लोक नोकरीला आहेत. संपूर्ण भारताचे छोटे रूप म्हणजे ही कंपनी असे म्हणायला हरकत नाही. एच.ए.एल. म्हणजे भारताची छोटी प्रतिकृतीच. रूजू होऊन मला पाच-सहाच दिवस झाले होते. तोपर्यंत परमारांशी प्रत्यक्ष बोलण्याचा माझा संबंध आला नव्हता. मला एका दिवसाची रजा हवी होती आणि त्यासाठी मी त्यांच्या कार्यालयात गेलो. ट्रेनिंग मॅनेजरशी बोलायचं म्हणून मी छापील मराठीत काय बोलायचे. ती तयारी करून गेलो. कॅबिनजवळ जाताच,

'मे आय कम इन सर' म्हणालो. (जे आम्ही हायस्कूलला असताना 'माय कमिंग सर' असे म्हणायचो. दहावीला असताना त्याचे खरे स्पेलिंग, उच्चार आणि अर्थ आम्हाला एका शिक्षकाने समजावून दिले. तेव्हापासून नीट उच्चार होत होता.)

परमार म्हणाले, 'यस'

मी शुद्ध मराठीत छापलेले शब्द वाचल्यासारखे म्हणालो,

"सर, मला माझ्या गावी - सटाण्याला फार महत्त्वाचे काम आहे. म्हणून उद्या एका दिवसाची रजा हवी होती."

परमार कपाळाला आठ्या पाडून म्हणाले, "क्या?"

मी एका दिवसाची रजा मागतोय म्हणून परमार वैतागले की काय म्हणून तसेच बेतलेले - पाठ केलेले वाक्य मी मराठीत पुन्हा म्हणायला सुरूवात केली.

परमार मध्येच तोडून म्हणाले, "क्या बात कर रह है आप?"

परमारांच्या समोरच्या खुर्चीवर कोणी गृहस्थ बसलेले होते. त्यांनी मध्ये हस्तक्षेप केला. मला हिंदी बोलता येत नसावे म्हणून त्यांनी माझ्याकडे सहानुभूतीने

पाहिले आणि माझे म्हणणे परमारांना हिंदीत ट्रान्स्लेशन करून दुभाषाचे काम केले. ते गृहस्थ म्हणाले,

"परमारजी, ये बोल रहे है कि, इनके नेटीव प्लेसमे - सटाणामें इन्हे बहुत जरूरी काम है, इसीलिए कल वो एक दिन की सीएल लेना चाहते है ।"

अतिशय किरकोळ गोष्ट होती, असा चेहऱ्यावर भाव आणून परमारजींनी एक सुस्कारा सोडला आणि टेबलाचा ड्रावर खसंकन ओढून त्यातन एक CL चा कोरा फॉर्म मला दिला. "यह लिख के साईन कर दो" म्हणाले आणि आपल्या कामाला लागले.

आपण रोजची अहिराणी सोडून एवढी शुद्ध मराठी बोललोत तरीही आपली उपेक्षा झाली म्हणून मी त्यावेळी खूप नाराज झालो होतो. अशा अनेक अनुभवातून हळू-हळू हिंदी भाषेविषयीचा माझा न्यूनगंडही गळून पडला. मग मी अहिराणीवरून मराठीची मधली पायरी ओलांडून डायरेक्ट हिंदीच्या पायरीवर अधूनमधून उड्या घेऊ लागलो.

**कवितेत अहिराणीचे उपयोजन -**

मी अहिराणीत कविता लिहितो. 'आदिम तालनं संगीत' या माझ्या अहिराणी कविता संग्रहात १५३ कविता आहेत. पण माझ्या मराठी कवितेतही अहिराणीतील विशिष्ट वैशिष्ट्यपूर्ण शब्द मुद्दाम वापरीत असतो. 'डंख व्यालेलं अवकाश' या मराठी कवितासंग्रहातील काही कवितांमध्येही असे शब्द वापरलेले आहेत. शब्दांबद्दल नियतकालिकाचे संपादक, वाचकही विचारणा करतात. मागील वर्षाच्या 'कवितारती'च्या दिवाळी अंकातील कविता वाचून 'टरंगघाणी' या शब्दाबद्दल शंकर रामाणी यांनी पत्राने अर्थाची विचारणा केली होती. 'उदई' या शब्दाबद्दलही म.म. केळकर यांनी विचारले होते. 'एकदाशी', 'टहाळबन', 'सूर्याखाल', 'डोंगराऊ', 'कोस', 'गुण्या', 'उदई', 'टरंगघाणी', 'आंगडं', 'घसड', 'सोला', 'फोत्र', 'आड्री', 'वऱ्हा', 'हेट्या' असे अनेक वैशिष्ट्यपूर्ण अहिराणी शब्द मी हेतुतः मराठी कवितेत वापरले आहेत - वापरत असतो. मात्र हे शब्द केवळ अट्टहास म्हणून वा कविता दुर्बोध करण्यासाठी वापरत नसून कविता अर्थपूर्ण करण्यासाठी व अहिराणीतील शब्द मराठीत रूढ व्हावेत या आशेने वापरीत असतो.

अलिकडे 'ढुब्बे' नावाचा अहिराणी शब्द कवितेत मी मुद्दाम दोन-तीनदा वापरला आहे. त्याला कारणही तसेच घडले.

मी सटाण्याला ज्या भागात रहातो, तो भाग सध्या नवीन डेव्हलप होतोय. तिथे पक्के रस्ते नाहीत. सर्वत्र शेतीची काळी माती आहे. त्यामुळे पावसाळ्यात चालताना अतोनात हाल होतात. चिखल वाळताना वाहनांच्या - ट्रॅक्टरांच्या रहदारीमुळे रस्त्याला खोलगट अशा दोन चकाऱ्या तयार होतात आणि मध्यभागी ओला चिखल फुगून फुगीर उंचवटे तयार होतात. अशा भागाला अहिराणीत 'ढुब्बं' असं म्हणतात. खरं तर हा शब्द त्या उंचवट्याचं नेमके चित्र डोळ्यासमोर उभं करतो. खोलगट भाग 'खड्डं' तर उंचवट भाग ते 'ढुब्बं'. म्हणून तो शब्द मराठीतसुद्धा रूढ व्हायला हवा. हा शब्द एकदा मी अनवधानाने बोलताना वाक्यात वापरल्यामुळे माझ्या एका प्राध्यापक मित्राने तो माझ्या टवाळीचा विषय केला. तो किस्साही मुळातूनच सांगतो.

कुठला तरी कार्यक्रम संपल्यावर रात्री उशीर झाला म्हणून आमचे एक ज्येष्ठ मित्र त्यांच्या फियाट गाडीतून मला घरी सोडायला आले. सोबत आमचे प्राध्यापक मित्रही बरोबर होते. ते महाविद्यालयात मराठी वाङ्मयासोबत भाषाशास्त्रही शिकवितात. तरीही रस्त्यात मी जेव्हा म्हणालो, "गाडी इकडून घ्या. या बाजूने गेलेत तर गाडीला खालून रस्त्यातले 'ढुब्बे' लागतील." तेव्हा हे मुळात अहिराणी भाषक असलेले प्राध्यापक-अभ्यासक मित्र हसले. नंतर संधी सापडेल तेव्हा त्यांनी या शब्दावरून माझ्यावर कोटयाही केल्या. या अनुभवापासून मी 'ढुब्बं' हा अहिराणी शब्द मुद्दाम कवितेतून वापरायला सुरूवात केली आहे.

दुसऱ्या एका अहिराणी भाषक मित्रानेच काही दिवसांपूर्वी मला एक शंका विचारली होती. त्याच्या त्या शंकेत जाणून घेण्यापेक्षा शिष्टपणाच अधिक दिसला. "अहिराणीशी माझा काही जास्त संबंध नाही. मी घरात मराठीच बोलत आलो आहे" असा दंभ ही त्याच्या बोलण्यात असतो. त्याची बालीश शंका अशी होती, त्याने मला विचारले, "अहिराणीत 'माडी' म्हणजे काय?"

मी म्हटलं, "घरावरच्या दुसऱ्या मजल्याला माडी म्हणतात."

तो : 'नाही. हा नाही अर्थ.'

त्याला कदाचित मराठीही नीट कळत नसेल म्हणून इंग्रजीत अर्थ सांगितला, 'Building'

तो म्हणाला, 'नाही'

मग म्हटलं, 'तो शब्द आलेलं एखादं अहिराणी वाक्य सांग. म्हणजे सांगता येईल.' तर तो म्हणाला.

'अहिराणीत आईला काय म्हणतात?'

म्हटलं, 'माय'.

मग तो म्हणाला, 'माझे मेव्हणे त्यांच्या आईला 'माडी' म्हणून हाक मारतात.'

इथे कपाळाला हात लावण्याशिवाय त्याला उत्तर देता येणार नव्हते. मित्र अहिराणी भाषक पण अहिराणीला कमी दर्जाची भाषा मानणारा होता. 'माडी' हे अहिराणीतील 'माय'साठी असलेले एक लाडीक संबोधन आहे हे खरे तर त्याच्याही लक्षात यायला हवे होते. 'माडी' हा 'माय'साठी अहिराणीतील मूळ शब्द नसून एक लाडीक संबोधन आहे. [तुळा : गुजराती बाई (स्त्री), बाईडी, बायडी (पत्नी) - संपादक]

**बोली आणि अश्लीलता -**

बोली भाषा आणि अश्लीलता यांचे खूप जवळचे नाते असू शकते. बोलीभाषेत अश्लीलतेची अपरिहार्यता नसली तरी तो एक अविभाज्य भाग असू शकतो. बोलीभाषेचे स्वरूप शहरी भागाकडून अविकसित दुर्गम भागाकडे तपासत गेल्यास शहरी भागापेक्षा ग्रामीण भागात वापरल्या जाणाऱ्या भाषेत अश्लीलता जास्त प्रमाणात दिसून येते. पण ही अश्लीलता आपल्या नागरी कानांना खटकत असली तरी अविकसित भागात त्यात अश्लीलता असल्याचे कोणालाही जाणवत नाही. लिंगवाचक शब्दांचा उल्लेख सर्वांसमक्ष ते एखाद्या सामान्य नामांसारख्या बिनदिक्कत करतात. त्याचे कोणालाही काहीही वाटत नाही. उदाहरणार्थ शहरी भागात एखाद्या स्त्रीने सार्वजनिक ठिकाणी शिवी दिली, "आततुले घोडा झये तुले" तर सर्वजण कान टवकारतील. औचित्याचा भंग होईल. पण हीच शिवी अहिराणी दुर्गम भागातील एखाद्या अहिराणी स्त्रीने भरल्या घरात दिली तरी त्याचे कोणाला काहीही सोयरसुतक वाटणार नाही. ज्या स्त्रीला उद्देशून ती शिवी असेल तिलाही खूप ते जिव्हारी लागणार नाही. आपल्या चुकलेल्या कामाचा या शिवीतून निषेध आहे, एवढाच अर्थ ती घेईल आणि कामाला लागेल. वापरून वापरून असे अश्लील उल्लेख बोलीभाषेत बोथट-गुळगुळीत झाले आहेत. त्यात नावीन्य राहिले नाही. ते एखाद्या नेहमीच्या नामासारखे निर्विकारपणे सहज वापरले जातात. ग्रामीण भागातील एखादी अहिराणी स्त्री आपल्या सख्या मुलीलाच सहज शिवी देऊन जाते, 'बारा बोडास्नी' या शिवीत तिला स्वतःलाही काही वाटत नाही. खरं तर ही शिवी तिच्या स्वतःच्याच चारित्र्याचा उद्धार करणारी ठरते, तरीही.



अनुक्रमणिका

नागरी दृष्टीने अश्लील ठरतील अशा प्रचंड प्रमाणातील शिव्या बोली भाषेत सापडतात. त्यांचा अर्थ गुळगुळीत झाला आहे. म्हणून माझ्या अहिराणी लोकपरंपरेतील 'बार' ह्या लेखात मी अश्लील शिव्या जश्याच्या तश्या उद्‌धृत केल्या आहेत. अश्लील शब्दांच्या जागी फुल्या घातल्या नाहीत. कारण ज्याला आपण अश्लीलता-अश्लीलता संबोधतो, ती ग्रामीणांच्या दृष्टीने अतिशय गौण आणि अपरिहार्यही आहे. बारातले हुबेहूब चित्र डोळ्यासमोर साकार करायचे असेल तर अशा काही ठिकाणी फुल्या मारून कसे चालेल? भाषेत जसे शुद्ध आणि अशुद्ध असे काही नसते. तसेच भाषेत श्लील आणि अश्लील असेही काही नसते. भाषा ही फक्त भाषा असते. नागरी भाषा आडवळणाने प्रतीक-प्रतिमांतून बोलत असेल तर बोलीभाषा रोखठोक बोलते. एवढ्यावरून तिच्यावर अश्लीलतेचा आरोप करता येणार नाही. [बोली भाषेतल्या प्रतिमा-प्रतीके नागर मंडळींना अश्लील वाटतात असे आपण म्हणू या. - संपादक]

आपल्याला कशालाही अश्लीलता म्हणून धोपटायची सवय पडली आहे. भाषेत आपण सोवळं-ओवळं आणायचा प्रयत्न करतो. अश्लीलता दिसताच एकतर टीका करून मारून-मुटकून निषिद्ध ठरवायचं आणि ज्या बुजुर्गांबाबत तसे करता येणार नाही असे दिसताच तिथे सुधारण्याचा प्रयत्न करायचा असे उद्योग मराठीत झालेले आहेत - होत आहेत. संत तुकारामांच्या अभंगाबद्दलही तसे घडले आहे तर तुमच्या आमच्या सारख्यांची काय कथा?

भले तो देऊ <u>कासेची</u> लंगोटी
नाठाळांच्या माथी मारू काठी

या तुकारामांच्या अभंगात 'कासेची' हा शब्द प्रक्षिप्त आहे. सोवळं-ओवळं पाळणाऱ्यांनी मूळ 'गांडीची' हा बोलीभाषेतील आणि त्यांच्यादृष्टीने अश्लील असलेला शब्द काढून तिथे 'कासेची' हा शब्द टाकला आहे. आपण संतानाही अश्लील आणि गावंढळ समजतो. त्यांच्या काव्याला 'सुधारण्याचा' प्रयत्न करतो. जे आपल्याला पचेल - भावेल असेच आपण वाचतो - लिहितो आणि न पचणारं दुरुस्त करून घेतो. संतांबाबत असं होत असेल तर आपल्या हातून बऱ्यावाईट लिहिलेल्या साहित्याचे काय होईल, याची कल्पनाच केलेली बरी.

**भाषिक सौहार्द** -

कोणताही सीमा प्रश्न आपण कितीही अस्मितेचा केला तरी लोकांच्या दृष्टीने त्यात काहीही तथ्य नसते. प्रत्येक सीमा भागातील लोकांना दोन-दोन भाषा अवगत

असतात - आहेत. अहिराणी भाषक मनुष्य मराठी, हिंदी आणि गुजरातीही सहज अवगत करू शकतो. या तिन्ही भाषांशी अहिराणीचे साहचर्य आहे. अनेक गुजराती शब्द अहिराणीत आढळतात. तसे हिंदीही आणि मराठी तर या भागातील शैक्षणिक भाषा आहेच. ['ठमीनं लगीन' म्हणजे गुजरातीत 'ठर्मीनुं लगन' यातले प्रत्ययाचे साम्य पहावे. - संपादक]

मध्यंतरी धारवाडला जाताना बसमध्ये माझ्या पुढच्या शीटावर बेळगावला दोन माणसे बसली. त्यांच्याही न कळत असावे, एकजण दुसऱ्याशी मराठी बोलत होता तर दुसरा पहिल्याशी कानडी. त्यांचा संवाद कुठेच अडखळत नव्हता. दोघांनाही एकमेकांच्या भाषा अवगत असाव्यात. हे खरे भाषिक सौहार्द. मराठी भाषक माणसाकडे 'महाराष्ट्र टाईम्स' दैनिक होते तर कानडीकडे कानडीतले कुठलं तरी. पेपर वाचून दोघांनी पेपर अदलाबदल केले आणि मराठी-कानडी बोलत अधून-मधून ते पेपरही वाचत होते. हे दृश्य माझ्या मनावर खूप चांगल्या पद्धतीने कोरले गेले. तेव्हापासून 'सीमाप्रश्न' हा माझ्या बाबतीत तरी जिव्हाळ्याचा वा अस्मितेचा प्रश्नच राहिलेला नाही.

गुजरात सीमेवर मराठी-गुजराती, कर्नाटक सीमेवर कानडी-मराठी, आंध्र सीमेवर तेलुगू-मराठी आणि मध्यप्रदेश सीमेवर मराठी-हिंदी असे भाषिक सौहार्द नांदायला हवे. असे प्रत्येक राज्यातील सीमावर्ती भागात होते. पण राजकीय हेतूने आपण नसलेला प्रश्न हा 'प्रश्न' म्हणून गाजवत राहतो.

सीमावर्ती भागातल्या लोकांचे काही प्रश्न नक्कीच असतील, तिथे सर्व आलबेल आहे असे म्हणायचे नाही. भाषिक अन्यायही थोड्याफार प्रमाणात सहन करावा लागत असावा. पण दोन्ही बाजूने भाषिक सौहार्द-औदार्य दाखविण्यात आले तर सीमावर्ती भागातील द्वैभाषिक स्थिती ही वरदान ठरू शकते. त्यासाठी दोन्ही भाषकांकडून सामंजस्य आवश्यक आहे.

**भाषा टिकवायच्या तर -**

भारतात असंख्य बोली बोलल्या जात होत्या. त्यांपैकी खूप भाषा मृत झाल्यात. आज बोलल्या जातात अशा आणि मोजता येतील अशा अठराशे बोलींचा भारतात नामोल्लेख सापडतो. ज्या भाषा जिवंत राहिल्या त्या सुशिक्षित लोकांमुळे नसून अशिक्षितांमुळे राहिल्या हे दुर्दैवाने सत्य विधान आहे. अहिराणी बाबतही हे विधान तितकेच खरे नव्हे.

सर्व बोलींमध्ये विपुल प्रमाणात मौखिक लोकसाहित्य आढळते.

आळशीपणामुळे वा सुशिक्षितांच्या न्यूनगंडामुळे ते दिवसेंदिवस विस्मृतीत लोटले जात आहे. [बहिणाबाई चौधरींची अहिराणी कविता प्र.के. अत्र्यांच्या जबरदस्त हस्तक्षेपामुळे आपल्यापर्यंत पोचली हे आपले भाग्य. - संपादक] अहिराणीत तर प्रचंड मौखिक लोकवाङ्मय परंपरेने टिकून आहे. काही नामशेष झाले आहे. थोड्या फार प्रमाणात संग्रहीत झाले आहे. पण जे काही आज शिल्लक आहे ते दुर्गम भागातील लोकपरंपरेमुळे. फक्त अहिराणी आणि इतर बोलींच्या संदर्भातच ही नोंद महत्त्वाची नाही तर आजच्या मराठीबद्दलही असेच म्हणता येईल. अहिराणी आणि मराठीही खेड्यापाड्यांतील अशिक्षित लोकांमुळेच अद्याप टिकून आहे. भाषा टिकवायला नुसती 'ओवी' पुरी पडत नाही. 'ओवी' तर हवीच पण सोबतीला ग्रामीण 'शिवी' ही भाषा अधिक जोरकस, सकस, प्रगल्भ आणि समृद्ध करीत असते. म्हणून मराठी भाषा विद्यापीठांमुळे अल्प टिकून आहे, असा जर कोणाचा समज असेल तर तो गैर आहे. मराठी टिकून राहण्यासाठी मराठीतल्या बोली जिवंत राहिल्या पाहिजेत. त्यांच्यातले लोकवाङ्मय लोककला जिवंत राहिल्या पाहिजेत आणि भाषेच्या बाबतीत श्लील-अश्लीलतेचे सोवळे ओवळे न पाळता संताच्या ओव्यांबरोबर ग्रामीण ओवी आणि ग्रामीण ओवीबरोबर अश्लील शिवीही जिवंत ठेवायला हवी, तेव्हा प्रमाणभाषा जिवंत राहतील.

सारांश, भाषा कोणीही कितीही कमावण्याचा प्रयत्न केला तरी अशा एखाद्या नेमक्या उत्सेकबिंदूक्षणी उत्स्फूर्तपणे आपली मातृभाषा जिभेवर आल्याशिवाय रहात नाही. कारण मातृभाषा ही नेणिवेत दाबून टाकण्याची वस्तू नाही. आपली इच्छा असो वा नसो ती उफाळून वर येणारच. म्हणून आपल्या मातृभाषेचा तिटकारा करण्याऐवजी तिचे संवर्धन करणे आवश्यक आहे - दुसऱ्या कोणत्याही भाषेचा द्वेष न करता. कारण भाषा ही फक्त भाषा असते. भाषेत अशुद्ध वा शुद्ध तसेच श्लील वा अश्लील असे काही नसते. भाषा संवादासाठी अस्तित्वात येते.

■

**टेलिफोन कॉलनी, बसस्थानकामागे, सटाणा - ४२३ ३०१.**



अनुक्रमणिका

# माझा जपानी अभ्यास

रोशन

"पटकन बोल! जर्मन शिकायचं का जपानी?" इति फोनवर अंजली. मीही तिचीच मैत्रीण! तिच्या असल्या गुगलीने डगमगणार थोडीच होते. मीही झटकन् पर्समधून नाणं काढलं, छापकाटा केलं आणि तिला उत्तर दिलं,

"जपानी."

कबूल! वरचा संवाद जरा बुचकळ्यात टाकणारा झालाय खरा! तर त्याचं असं आहे, की मी अन अंजली अशा दोघी मध्यमवयीन मैत्रिणी. एव्हाना आमची पिले बऱ्यापैकी मोठी झालीत. बऱ्यापैकी म्हणजे एव्हाना स्वतःचे गृहपाठ स्वतः उरकायला शिकली आहेत. त्यामुळे आता हाताशी थोडा फुरसतीचा फावला वेळ मिळू लागला आहे. मग या फुरसतीच्या वेळात करायचं काय? भिशीपार्ट्या, महिलामंडळे किंवा थातुरमातुर समाजसेवा ह्यात तर आम्ही फिट्ट होऊ शकत नाही. तेव्हा मग त्यावर आम्ही वरचा उपाय शोधून काढला.

अशा रीतीने आम्ही दोघी मैत्रिणी जोडीने जपानी भाषेच्या क्लासमध्ये येऊन दाखल झालो. सर्व क्लासचे स्वरूप बघितले आणि एकटीने न येता जोडीने तिथे पोहोचल्याचे बरे वाटले. कारण त्या क्लासमधील इतर विद्यार्थी तर आमच्यापेक्षा वयाने पुष्कळ धाकुले होतेच, पण शिकवणाऱ्या 'सेन्सेइ' सुद्धा आमच्यापेक्षा १०-१२ वर्षे लहान होत्या.

ह्या अशा वयाच्या अंतरामुळे, अनेक पातळ्यांवर आमच्यात फरक होता. पहिल्या दिवशीच सर्वांना प्रश्न टाकण्यात आला,

"तुम्ही जपानी शिकायला का आलात?"

आता आली का पंचाईत? कारण इतर सर्व दिशांनी,

"मला टूरिझममध्ये करिअर करायचंय."

"मला उच्चशिक्षणासाठी जपानला जायची इच्छा आहे."

"आमच्या कंपनीचे एका जपानी कंपनीशी कोलॅबरेशन होते आहे."

असली भारदस्त उत्तरे यायला लागली. ह्यानंतर आपण "टाइम-पास" असे उत्तर देणे, म्हणजे अगदी नाक कापून घ्यायचीच गोष्ट होती. पण हम भी किसीसे कम नहीं, मी तत्काळ उत्तर सोडले.

"माझे दोन छोटे जपानी पुतणे आहेत. त्यांच्याशी संवाद साधण्यासाठी मला जपानी शिकायचंय."

अंजलीचं उत्तर तर ह्याहून मासलेवाइक होतं.

"मला मूळ जपानीमधून हायकू वाचायचेत."

असली चुणचुणीत उत्तरं ऐकून सेन्सेइसानचे डोळेच चमकले. 'सॅम्पल्स प्रथमदर्शनी वाटतात तेवढी टाकाऊ नसावीत' असा त्यांनी विचार केला असावा. पण बाहेर पडल्या पडल्या आम्ही एकमेकींचे फुगे फोडलेच.

"ओ काकूबाई, तुमचे जपानी ऐकून तुमचे पुतणे म्हणतील की, बाई गं आम्ही इंग्रजीच काय, पण मराठी पण शिकतो, पण तुझं जपानी आवर."

"माहितीये. तुम्ही वीस वर्षांपूर्वी कविता पाडायच्यात ते! पण आता पुलाखालून बरंच पाणी वाहून गेलंय म्हटलं. आल्यात मोठ्या हायकू पाडणाऱ्या!"

अहो, हे असं वीस वर्षांनंतर पुन्हा काही शिकायला बसायचं म्हणजे कित्ती अडचणी असतात. सर्वात मोठी पहिली अडचण होती की दीडतास गप्प एका जागी बसून दुसऱ्याचं बोलणं ऐकायची. माझीतरी परिस्थिती बरी होती. पण अंजली तर बोलून चालून कॉलेज शिक्षिका, तिच्यासाठी तर हे पूर्णतः रोल रिव्हर्सच होत होते. त्यामुळे आम्ही पहिल्या दिवसापासून चुळबुळायचो अन् एकमेकीत पुटपुटायचो. म्हणजे उदाहरणार्थ 'बबन कमळ बघ', 'छगन कमळ बघ' छापातला पहिला धडा सुरू झाल्यावर अंजू पुटपुटली, 'एवढं समोरचं दिसत नाही?? डोळे आहेत का खाचा?' हे सर्व अनाहूत होत असे. पण आमचे असे हे पुटपुटणे हा इतरांच्या करमणुकीचा विषय आहे हे आम्हांला लवकरच समजलं. कारण आमच्या एका दिवसाच्या अनुपस्थितीनंतर आमच्या एका गुरुबंधूने लागलीच आम्हांला ऐकवले, "कल आप दोनों नहीं थीं, तो कोई मजाही नहीं आया !"

आता हा कॉम्प्लिमेंट समजावा का टपली, हे मात्र मला सांगता येणार नाही.

शिक्षणाची सुरवात तर आधुनिक भाषाशिक्षणाच्या नियमांनुसार अत्यंत मनोरंजक झाली. म्हणजे भाषेचा वापर, छोटेछोटे संवाद आणि छोटेमोठे खेळ, अशा रीतीने. पण ह्याबरोबर हळूहळू व्याकरण नावाचा एक उंट तंबूत शिरत होताच होता. आमच्या सेन्सेइसान मोठ्या चलाखच म्हटल्या पाहिजेत, कारण ह्या

व्याकरण नावाच्या उंटाचा त्यांनी मोठा उत्तम परिचय करून दिला, की ज्यायोगे प्रथम दर्शनी तरी आम्ही त्याला घाबरून जाऊ नये. म्हणजे त्यांनी सांगितलं की जपानीत लिंगभेद नाहीत, वचनभेद नाहीत, भूतकाळ अन् वर्तमानकाळ हे दोनच काळ मुख्यतः वापरण्यात येतात, भविष्यकाळाचा वापर क्वचित कधी होतो. इ.इ. पण "हे तर काय सोप्पंच आहे सगळं!" हा भ्रम फार थोडेच दिवस टिकला. कारण लवकरच 'काउंटर्स' नावाचा प्रकार शिकवला गेला आणि लक्षात आलं की भारतीय किंवा युरोपीय भाषांमध्ये सर्व प्रकारच्या सामान्यनामांचे स्त्रीलिंग, पुल्लिंग, अनेकवचन, एकवचन एवढ्या चार भागातच विभाजन केले गेले आहे. पण जपान्यांचे डोके ह्याहून और! त्यामुळे त्यांनी असे बारा-तेरा भाग केले आहेत. म्हणजे तुम्हांला जर उंच, शेलाट्या वस्तू (उदा. पेन्सील, झाड आदि) मोजायच्या असतील तर एक रीत, गोल गरगरीत वस्तू (उदा. कप, चेंडू, हिंरे) मोजायच्या असतील तर दुसरी रीत, पेयांसाठी अजून वेगळी, माणसांसाठी वेगळी, पक्ष्याप्राण्यांसाठी वेगळी...

आता हा सर्व तिढा डोक्यातल्या कॉम्प्युटरमध्ये चढवावा कसा? लेकरांचे घेतलेले अभ्यास ताजे होतेच. झालं! फटाफट चार्ट्स् बनायला लागले, वह्यात उभ्या आडव्या रेघा मारून टेबलं तयार व्हायला लागली, सरासर याद्या घडायला लागल्या आणि आम्ही स्वतःवरच खूष झालो.

"बघ! बाकी काही नाही तर 'Japanese grammar for non-Japanese people' असलं काहीसं एखादं पुस्तक आपण सहज पार पाडू शकू."

हे आगाऊ वाक्य ऐकून तो आकाशातला बाप खुदकन् हसला असला पाहिजे. कारण ह्यानंतर तीनच दिवसात एक नवीन यादी बनवणे सुरू झाले. तिचं शीर्षक होतं, 'अचरट त्रासदायक क्रियापदे.' म्हणजे बघा, एक 'काकेरू' असं क्रियापद असतं. ते जर चष्म्याबरोबर आलं, तर चष्मा घालणे. टेलिफोनबरोबर आलं, तर टेलिफोन करणे आणि खुर्चीबरोबर आलं तर खुर्चीवर बसणे असे त्याचे तीन वेगवेगळे अर्थ असू शकतात. आता सांगा हे क्रियापद शुद्ध छळवादी आहे की नाही ते! (खरं म्हणजे असली छळवादी क्रियापदं आपल्या मायमराठीत पण आहेत. उदा. थंडी वाजते अन् टाळीही वाजतेच. आणि आपलं पुल्लिंगी वस्तू व स्त्रीलिंगी वस्तू हे प्रकरण तर परभाषीय मंडळींना गरगरायलाच लावत असेल नाही?!)

जपानी लोक त्यांच्या विनयशीलतेसाठी प्रसिद्ध. म्हणजे दुसऱ्याचं सगळं कसं

भारदस्त 'छान छान' अन् माझं मात्र 'कसचं कसचं', 'साधारणसं' असा सगळा खाक्या. अन् ह्याचा भाषेवर केवढा प्रभाव! त्यामुळे मग नातेवाईकांची यादी करताना मधोमध एक रेघ पडली आणि डावीकडे माझे सामान्य नातेवाईक आणि उजवीकडे इतरेजनांचे घरंदाज, 'वा! वा!' नातेवाईक अशी विभागणी झाली. म्हणजे बघा, माझी मोठी बहीण ही साधी 'आने' तर तुमची 'ओनेऽसान' इ. 'आपला तो बाळ्या, आणि लोकांची ती कार्टी' असल्या मराठी संस्कृतीला कसं मानवणार हे? अन पुन्हा लक्षात ठेवायला हा असा डबलडेकर शब्दसंग्रह! तरी बरं, 'माझ्या पोराच्या बापाला, डावीकडचा बाप म्हणायचं की उजवीकडचा?' हा प्रश्न विचारायचं धाडस मी अजून केलं नाहीये. कुणी सांगावं, एखादी तिसरी यादी पदरात पडायची.

मला माझ्या जपानमधल्या दिराची आठवण झाली. "आपली मराठी बापडी बरी आहे. दूध पिणार आहेस का नाही? सगळा रोखठोक मामला. आता मला जपानीमध्ये ह्या पोट्ट्याला विचारावे लागणार, "आपण आता दूध पिण्याचे मनावर घेणार आहात का नाही?"

जपान्यांचं एक बरं आहे ते जसं बोलतात, तसं लिहितात, म्हणजे स्पेलिंगांची भानगड नाही. त्यामुळे लवकरच त्यांच्या प्रमुख दोन लिप्या आल्याने आम्ही धाडधाड वाचायला लागलो. पण मग सेन्सेइसानने एक नवा खेळ काढला. कॅसेट ऐकायची आणि कोण कोणाला काय म्हणाले ते ओळखायचे. स्वतःच्या शुद्ध तुपातल्या, खणखणीत उच्चारांवरती खूष असलेल्या आम्ही जेव्हा ते जपान्यांचे जपानी ढंगातले उच्चार ऐकले तेव्हा हबकलोच. 'ओपनिंग डायलॉग' अन् 'व्होकॅब्युलरी' यांखेरीज काही म्हणता काही समजेना. बरं, सेन्सेइना 'कृपया सावकाश बोला.' अशी विनंती जपानीत करता यायला लागली होती. तेही तर ह्या बाबतीत शक्य नव्हते.

आमची गाडी ह्यानंतर ठेचकाळली ती 'greetings' च्या speed breaker ला. 'रामराम! बरं हाय का?' आणि 'येतो आता!' एवढीच greetings असलेल्या मातृभाषेची आपण लेकरं. आता सवयीनं इंग्रजी लोकांचं 'Thank you!' 'Good morning!' पचवायला लागलो आहोत. अशा ह्या डोक्यावर जपानी भाराभर greetings चा भार कसा पेलणार?! जपान्यांचं म्हणजे उठल्यापासून हे असलं बोलणं. इंग्रजांच्या Good morning. Good evening ला समांतर मालिका तर आहेच. पण त्या पलीकडे, जेवायला बसताना अमूक बोलायचे, उठताना तमूक.

घरात शिरायचं एक वाक्य, घर सोडायचं दुसरं. प्रथम भेटीत म्हणायचं, 'आपण प्रथमच भेटतो आहोत. माझ्याशी दयाळूपणे वागा.' पुन्हा ह्यात औपचारिकपणाचे स्तरावर स्तर. म्हणजे साधं 'पुन्हा भेटू.' म्हणायचं तर ते जर अगदी जवळच्या कोणाला किंवा वयानं लहान व्यक्तीला म्हणायचं तर वेगळं, कोणाशी औपचारिक भेटीनंतर म्हणायचं तर वेगळं आणि टीव्हीवरच्या बाया व बुवा तर औपचारिकपणाचा कडेलोट असणारं वाक्य वापरणार. हुश्श! मला हे सर्व समजावून घेतानाच दमायला झालं. ते सर्व लक्षात ठेवणं, म्हणजे धापा लागायचाच प्रकार.

जपान्यांच्या पहिल्या दोन लिप्या-हिरागाना अन् काताकाना-ह्या तशा सोप्या आहेत. देवनागरीच्या वळश्यांची सवय झालेले आपण ह्या लिप्या सरासर पार पाडतो. पण खरी ठेच लागते ती कांजीच्या-चित्रलिपीच्या वाटेला गेल्यावर. म्हणजे त्या कांज्या काढायला मजा येते आहे. त्या कधीतरी त्यांच्या त्या विशेष ब्रशने काढून बघाव्याश्या वाटताहेत. पण खरी गोम त्यांच्या वाचनात आहे. ही लिपी मूळची चिन्यांची. जपान्यांनी ती उसनी घेतली. त्यामुळे प्रत्येक कांजी दोन पद्धतीने वाचता येते. चिनी पद्धतीने अन जपानी पद्धतीने. मग दर कांजी चिनी पद्धतीने कशी अन केव्हा वाचायची आणि जपानी पद्धतीने कशी अन केव्हा, हे लक्षात ठेवणे आले. हरहर! मला तर काळजीच वाटायला लागली, हे जपानी लोक सकाळी सकाळी पेपर वाचायला किती वेळ लावत असतील कोण जाणे?

आपण ओळखलं असेलच की, एव्हाना आमचं जपानी शिक्षण हा दोन्ही घरात विनोदाचा आणि चेष्टेचा विषय झाला आहे. आमच्या खडबडीत जिभांवर ही गोगलगाय, ही गुळगुळीत भाषा कशी चढणार हा तर सर्वांना चर्वित-चर्वण करायचा मोठ्ठा विषय झाला आहे. बरं तर बरं, आमच्याकडून उसनी घेतलेली जपानी वाक्यं आपल्या शाळा सोबत्यांवर सोडून आमच्या पोरी अकारण भाव खाताहेत.

अगदी खरं मनापासून सांगू, एव्हाना ह्या धडपडीची चक्क गोडी लागली आहे. 'आमची सहल', 'माझा देश' इ. इयत्ता तिसरी, चौथी छाप निबंध मोडक्या तोडक्या जपानीत लिहायला चक्क धमाल येते आहे. एव्हाना गेली वीस वर्षे जी वरच्या मजल्यावर धूळ साचली होती ती धुतली जाऊन ज्ञानही आतमध्ये झिरपायला लागले आहे. गेला बाजार समोर येणाऱ्या परीक्षाही उरकाव्यातसं म्हणते आहे, पण त्यांचं दडपण नाहीये. त्यातून नुकताच जपानहून मेल आला की, माझ्या

जपानी शिक्षणाच्या बातमीने उल्हसित होऊन माझ्या सहा वर्षांच्या पुतण्याने आपली इयत्ता पहिलीची सर्व पुस्तकं बांधून ठेवली आहेत - मला पाठवायला. म्हणजे तर काय, 'त्या' संवादातलं पहिलं पाऊल पडलंचकी. मग काय ह्या सर्व धडपडाटाचं सार्थकच अन काय!!

■

चिनार, ४९ सावरकरनगर, सिडको एन ५ दक्षिण, औरंगाबाद ४३१ ००३.

## शंभरवर्षांपूर्वीची उर्दूतील भगवद्‌गीता

कुरूक्षेत्र विद्यापीठातून निवृत्त झालेल्या डॉ. हरी अनंत फडके यांना नाशिकमध्ये भगवद्‌गीतेच्या उर्दू भावानुवादाचे पुस्तक मिळाले आहे. हे पुस्तक उर्दू भाषेत आणि लिपीमध्ये सुमारे १०० वर्षांपूर्वी छापलेले आहे. गीतेच्या अनेक भाषांतील आवृत्त्यांवर पार्थसारथी कृष्णाचे कुरूक्षेत्रावरील चित्र असते. पण या पुस्तकाचे वेगळेपण म्हणजे ते चित्र या पुस्तकावर नाही. या पुस्तकावर चित्र आहे ते बासरी वाजवणाऱ्या श्रीकृष्णाचे! शिळाप्रेसने छापलेल्या या पुस्तकावर लेखकाचे नाव नाही.

पुस्तकाच्या मलपृष्ठावरील सारविज्ञापन असे आहे -

"इस गीता को जो पढेगा उसे एक हजार अश्वमेध यज्ञ करनेका पुण्य प्राप्त होगा। ये किताब राहत बख़्शती है, जो इसे पढेगा, सुनेगा उसे सुख प्राप्त होगा, आबादी आबाद होगा।"

गीतेसारख्या ग्रंथाचा उर्दू भाषेत भावानुवाद होणे ही गोष्ट धर्माचा संबंध केवळ माणुसकीशी असल्याचे स्पष्ट करते.

■

('मेहता मराठी ग्रंथजगत'च्या आधारे डिसेंबर २००२, पृ. ६)












# आरती विधी - उत्पत्ती आणि व्युत्पत्ती

निर्मला कुलकर्णी

हिंदूधर्मीयांच्या पूजापद्धतीमध्ये आरती या विधीला अनन्यसाधारण महत्त्व आहे. तबकात निरांजन ठेवून घंटेच्या नादावर आणि टाळाच्या ठेक्यांवर विशिष्ट पदे म्हणत मूर्तीला ओवाळणं हे या विधीचं सर्वसाधारण स्वरूप आहे. 'आरती' हा शब्द 'आर्तिक्य' या शब्दापासून बनला असून 'देशी अथवा द्राविडी असावा असं भारतीय संस्कृतीकोश आणि मराठी व्युत्पत्तीकोश नमूद करतात. परंतु, आर्तिक्य या शब्दापासून 'आरती' शब्द बनला आहे असं मानण्यामध्ये काही अडचणी आहेत.

त्यातली महत्त्वाची अडचण म्हणजे 'आर्तिक्य' हा शब्द सतराव्या शतकानंतरच्या संस्कृत वाङ्मयामध्ये आढळतो आणि कदाचित म्हणूनच मोनियर विल्यम्स् आणि वा.शि. आपटे यांच्या शब्दकोशामध्ये त्यांचा अंतर्भाव केलेला नाही. आसेतुहिमाचल प्रचलित असलेल्या या प्राचीन विधीसाठीचा शब्द मात्र सतराव्या शतकानंतर उपलब्ध व्हावा हे अतर्क्य आहे.

या विधीला बंगाली, उडिया इ. भाषांमध्ये 'आरात्रिक' म्हणतात. टर्नरनेही A Comparative Dictionary of Languages मध्ये 'आरात्रिक' शब्दापासून 'आरती' शब्द बनला असल्याचं नमूद केलं आहे. जुन्या संस्कृत वाङ्मयापैकी अथर्ववेदपरिशिष्टामध्ये 'आरात्रिक विधान' नावाच्या विधीचं सविस्तर वर्णन आढळतं.

या विधीच्या उत्पत्तीच्या संदर्भात वरील ग्रंथामध्ये एक मजेदार कथा सांगितली आहे. असुरांच्या पुरोहितानं करणी करून इंद्राची झोपच उडवून लावली. त्याला काही केल्या झोप येईना म्हणून इंद्र बृहस्पतीकडे गेला. बृहस्पतीनं आरात्रिक नावाचा विधी केला. रात्रिदेवतेची चार दिवे असलेली मूर्ती तयार केली. सुगंधी द्रव्यांनी आणि फुलांनी तिची पूजा केली. या प्रतिमेनं इंद्राला ओवाळलं. ओवाळत असतानाच 'आरात्र्याणि' नावानं प्रसिद्ध असलेल्या सूक्तांचं पठण केलं आणि मग त्या मूर्तीचं विसर्जन केलं. अशाच प्रकारे राजपुरोहितानं रोज राजासाठी हा विधी करावा असं सांगितलं आहे.

या विधीला आरात्रिक हे नाव पडण्याचं कारण म्हणजे 'आरात्र्याणि'

सूक्तांमधील पहिली ऋचा

*"आ रात्रि पार्थिवं रजः पितुरप्रायि धामभिः ।*
*दिवः सदांसि बृहती वितिष्ठसे आ त्वेषां वर्तते तमः ॥"*

*अथर्ववेद १९.४७.१*

"पृथ्वी, अंतरिक्ष, द्यूलोक आणि त्यावरची सर्व स्थाने तुझ्या अंधःकाराने व्यापून टाकली आहेस. तू श्रेष्ठ आहेस म्हणूनच द्यूलोकातील उंच स्थानं व्यापतेस. तुझा अंधकार सर्वत्र व्यापून असतो." रात्रीची प्रार्थना असलेल्या या ऋचेच्या 'आ रात्रि' या पहिल्या दोन शब्दांमुळेच या विधीला 'आरात्रिक' असं नाव मिळालं. प्राचीन काळी हा विधी राजाच्या ऐहिक सुखसमृद्धीसाठी आणि मानसिक सुखशांतीसाठी रोज रात्री पुरोहित करीत असे. कालांतरानं जेव्हा सर्व राजोपचार देवपूजेमध्ये संक्रमित झाले तेव्हा या विधीलादेखील देवपूजेमध्ये स्थान मिळालं. त्यावेळी 'आरात्रिक' या प्रतीकमंत्रानं सुरू होणाऱ्या सूक्तांची जागा देवतावर्णनपर श्लोकांनी अगर पदांनी घेतली. त्यामुळे 'आरात्रिक' हे नाव निरर्थक ठरलं. म्हणूनच 'ईशानशिवगुरूदेवपद्धती'सारखे ग्रंथ आरात्रिक हा शब्दप्रयोग करत असले तरी 'आराद् भ्राम्यम् आरात्रिकम्' 'मूर्तीला जवळून ओवाळणं' असा अर्थ लावतात. कारण 'आ रात्रि' हे सूक्तप्रतीक त्यांना माहित नाही.

'आरार्तिक' असाही एक पाठभेद यामधून निर्माण झाला. शंकराचार्यांनी या शब्दाचा प्रचुर वापर आपल्या स्तोत्रांमध्ये केला आहे. याखेरीज 'आराती' असाही पाठभेद काही हस्तलिखितांमध्ये सापडतो. पुढे कदाचित मनाच्या आर्तियुक्त स्थितीशी संबंध जोडून आर्तिक्य शब्द निर्माण झाला असण्याची शक्यता आहे. संस्कृत व्याकरणाच्या चौकटीत तो बसत नसल्यामुळे त्यावर 'देशी' अथवा 'द्राविडी' असा शिक्का बसला असण्याची शक्यता आहे.

दुसरी प्रबळ शक्यता आहे ती अशी आरतिक्य आणि आर्तिक्य हे शब्द सतराव्या शतकानंतरच्या महाराष्ट्रातील ग्रंथांमध्ये आढळतात. कदाचित् आरात्रिक हा शब्द आरार्तिक - आराती - आरती असा बदलत गेला असेल. सतराव्या शतकाच्या सुमारास 'आरती' या शब्दाचे संस्कृतीकरण [Sanskritiation] होऊन 'आर्तिक्य' किंवा 'आरतिक्य' शब्द अस्तित्वात आला असेल. 'आर्तिक्यसंग्रह' आणि 'आर्तिक्यकदम्ब' लिहिणाऱ्या मोरोपंत आणि काशिनाथ उपाध्याय यांनी या शब्दाच्या प्रचाराला हातभार लावला असण्याची शक्यता आहे.

एकंदरीत, आज प्रचारात असलेला 'आरती' हा शब्द 'आरात्रिक' या

संस्कृत शब्दापासून उत्पन्न झाला आणि मूळचा राजोपचार देवतोपचार बनला.

■

संस्कृत प्रगत अध्ययन केंद्र, पुणे ४११ ००७.

## अभिहसावे की अभिरडावे?

हल्ली आयुर्वेदिक औषधांना जरा बरे दिवस आले आहेत. या घटनेचा एक भाषिक पैलू. काही कंपन्या आपल्या औषधांना 'हर्बल मेडिसिन' (वनस्पतिज औषध) म्हणतात. काही कंपन्या औषधांची मूळची संस्कृत नावे न देता किंवा नवीन वर्णनपर देशी नावे न देता (जसे महानारायण तेल, त्रिभुवनकीर्ति, श्वासहरी, पित्तशामक गोळी) न देता इंग्रजी नावे देऊ लागल्या आहेत (कधी लॅटिनग्रीक तर कधी देशी इंग्रजी नावे).

परिणामी ज्या डॉक्टरांनी (डॉक्टर, तुम्हीसुद्धा!) आणि पेशंटांची एरवी त्यांच्याकडे ढुंकूनसुद्धा बघितले नव्हते आणि (संस्कृत वा देशी नाव असल्यास) अजूनदेखील बघत नाहीत ती मंडळी ही औषधे उपयोगात आणू लागली आहेत. यात होते काय? काही परिणामकारी औषधे अधिक वापरात आली तर काही मर्यादित उपयोगाच्या औषधांबद्दल कंपन्या भरमसाट दावे करून लोकांना भुलवत आहेत.

आता या सगळ्या प्रकाराला (आचार्य अत्र्यांच्या अजोड शब्दांत सांगायचे तर) अभिहसावे की अभिरडावे हे आम्हाला समजेनासे झाले आहे.

■

**प्रेषक : अशोक रा. केळकर, पुणे.**

## भाषावार्ता

पुण्यातील "प्रतिमान" या संस्थेच्या "प्राथमिक शाळेतील भाषा-शिक्षण : अडचणी आणि उपाय" या संशोधन-प्रकल्पाला महाराष्ट्र फाऊंडेशनचे एक लाख रुपयांचे अनुदान मिळाले आहे. या प्रकल्पाचे मुख्य संशोधन क्षेत्र-मोड आणि आसपासची बहुल गावे ता. तळोदा, जि. नंदुरबार आणि आलुंगण आणि आसपासच्या आश्रमशाळा ता. सुरगाणा, जि. नाशिक ह्या गावातील शाळा आहेत. या प्रकल्पामध्ये मुलांच्या भाषा-संपादनामध्ये येणाऱ्या अडचणी शोधणे आणि प्रमाण मराठी भाषेचा या मुलांना किती उपयोग होईल याची पाहणी केली जाणार आहे. या अभ्यासातून स्थानिक बोलीभाषा आणि प्रमाण भाषा यांच्यातील साम्य आणि भेद शोधण्याचा प्रयत्न केला जाणार आहे. अशा प्रकारचे काम प्रतिमान ही संस्था गेली दोन वर्षे करते आहे.

■



अनुक्रमणिका






# शुद्धलेखन : अनुभव आणि प्रयत्न

राजकुँवर सोनवणे

मा. द. भि. कुलकर्णी यांचा 'शुद्धलेखनाचे मानसशास्त्र' (दिवाळी २००२) लेख वाचला. आवडला. अध्यापनकाळातील अनुभव व केलेले प्रयोग आठवले. लेखनरूग्णांवर उपचार करण्यात अर्धे आयुष्य घालविले. 'मी कुणी पंडिता नाही. मानसशास्त्रज्ञ तर मुळीच नाही, पण लष्कराच्या भाकरी भाजणारी हाडाची शिक्षिका, प्राध्यापिका व मराठी विषयसमितीची अध्यक्षा आहे.' अध्यापनकार्यात 'ठेचा' लागत होत्या पण आंधळेपणाने ठेचकाळत जाण्यापेक्षा 'ठेच' का लागली याचा 'शोध' घेऊन 'दगड' बाजूला करण्याचे अथक प्रयत्न केले. .... आणि अशा अज्ञानी व बेफिकीर लेखनरूग्णांची खोड मोडता येते असा आत्मविश्वासही आला. त्यासाठी शिक्षकाजवळ 'एकनाथांची सहनशीलता' मात्र पाहिजे, तसेच रामदासस्वामींची 'अखंड सावधानताही' हवी! समाजात, शिक्षणक्षेत्रात, सर्वत्र अशा बेफिकीर व्यक्ती आढळतात आणि त्या अशुद्ध लेखनाच्या अशुद्ध शब्दांच्या, अशुद्ध उच्चारांच्या पिचकाऱ्या टाकत असतात, त्यांचे तुषार शिक्षकांच्या अंगावर उडतच असतात, अशावेळी शिक्षकाने अजिबात न चिडता नाथांप्रमाणे शुद्धीकरण करण्याचा आटोकाट प्रयत्न करावा.

बरं, या मंडळींचं एरवी अक्षर सुंदर असतं. लेखन सुवाच्य असतं आणि बऱ्यापैकी शुद्धही असतं. मग त्यांच्या लेखनातील एखाद-दुसराच चुकार शब्द चुकीचा का? याचा अन्वयार्थ कसा लावायचा?..... तर याची मुळं लहानपणात दडलेली असतात. कुणीतरी त्यांना चुकीचे शिकविलेले असते, किंवा असेही असू शकते की ती व्यक्तीच नकळत चुकीचा शब्द लिहित असावी. कदाचित 'तू हा शब्द चुकीचा लिहितोस!' याची त्याला / तिला कुणीच जाणीव करून दिली नसेल. मग अज्ञानापोटी ती सवय दृढ होत जाते आणि प्रतिक्षिप्तक्रियेत रूपांतरित होते. अर्थात, न निवडलेल्या तांदळाचा भात खाताना 'कचकच' लागते तसे या मंडळींचे लेखन, उच्चार शिक्षकांच्या मनाला 'चरे' पाडतात........ विद्वानमंडळी चार

भिंतीत बसून भाषेचं शास्त्र अभ्यासतात, विश्लेषण करतात, नियम तयार करतात. शिक्षकाला मात्र या अज्ञानाशी प्रत्यक्ष 'लढा' द्यावा लागतो. त्यातही 'पाट्या' टाकणारे संख्येने अधिक! तळमळीने अध्यापन करणारे बोटावर मोजण्याइतकेच! ते कितीसे पुरे पडणार? विद्यार्थ्यांची प्राथमिक स्तरावरूनच 'अज्ञानाची गाठोडी' घेऊन वाटचाल सुरू होते. पुढे प्रत्येक पायरीवर कुणीतरी त्यांच्या लेखन दोषांची दखल घेतली तर बरे! ज्ञानाच्या कक्षा रूंदावत असताना आणि असंख्यांच्या लोंढ्यातून जाताना त्यांना त्यांच्या अज्ञानाची जाणीव करून देणारा एखादाच गुरू भेटतो.

..... मला आठवते मी एस. पी. कॉलेजमध्ये बी.ए. मराठीचे अध्ययन करीत असताना माझे चुकलेले दोन शब्द : प्रतिथयश, आकस्मित. माझ्या प्राध्यापिका डॉ. अनुराधा पोतदार यांनी दुरूस्त केले. पुढे कधीतरी टिळक महाराष्ट्र विद्यापीठात प्रश्नपत्रिका संपादक असताना मो. रा. वाळंबे यांनी माझ्या 'ज' या अक्षराचे चुकलेले वळण दुरूस्त केले. वरील घटना मी अद्यापही विसरले नाही आणि त्या चुका मी पुन्हा केल्या नाहीत.

पुढे अध्यापनकाळात, विद्यार्थ्यांच्या लेखनातील चुका : शब्दांच्या चुका, अक्षरांची चुकीची वळणे, चुकीची वाक्यरचना इ. तसेच शिक्षकांच्या लेखनातील चुका; कॅटलॉगमधील नावांच्या चुका, वार्षिक अंकाच्या लेखांतील चुका शोधण्याचा मला छंदच लागला व त्यावर उपचारासाठी प्रयोग सुरू झाले. अनेक प्रकल्प सिद्ध झाले. शोध निबंध लिहिले नि त्यांच्याबरोबर मी ही शिकत गेले.

शेवटी प्रश्न उरतोच, 'मायमराठीच्या महासागरात आपापल्या मगदुराप्रमाणे अनेकांनी आणून टाकलेला 'कचरा' उपसायचा कुणी?

उत्तर;

शिक्षकानेच! बिचारा शिक्षक!
बा शिक्षका,
वाकुल्या तुला दाखवत दाखवत,
झुंड पुढे जातच असते.
मागून येणाऱ्या झुंडीला,
तुला सामोरे जायचे असते!

■

**राजमाता कॉम्प्लेक्स, मार्केटयार्ड, पुणे.**











# भाषाविषयक लेखनसूची : इ.स. २००२

राजशेखर शिंदे

## ● ग्रंथ

१) कोठावदे मावची, 'बोली, समाज आणि संस्कृती' आशापुरी प्रकाशन, साक्री.

२) नाईक सदानंद, राजभाषा मराठी, व्यावहारिक मराठी परंपरा, स्वरूप आणि प्रक्रिया, नागरी सेवा प्रबोधिनी, मुंबई.

३) पगारे म.सु., 'अहिराणी म्हणीतील समाजभाषा', प्रतिमा प्रकाशन, पुणे.

४) परब प्रकाश, 'मराठी व्याकरणाचा अभ्यास' ओरिएन्ट लॉंगमन, मुंबई.

५) बिनिवाले अविनाश, 'भाषाकारण', मुद्रा प्रकाशन, विरार, मुंबई.

६) भागवत गीता, 'विद्यापीठ प्रशासनाचे मराठीकरण', शिवप्रताप प्रकाशन, पुणे.

७) मोकाशी सयाजीराजे व नेमाडे रंजना, 'व्यावहारिक मराठी', प्र. शेतकरी साहित्य (इर्जिक परिषद)

८) सहस्रबुद्धे प्र.ग., 'माय मराठीची हाक', भारतीय विचार साधना, नागपूर.

## ● नियतकालिकातील लेख -

१) मराठी मृतवत् व्हायची नसेल तर...... परिसंवाद. लोकसत्ता (मुंबई) दिवाळी २००२ पृ. ६५-८० बीजलेख : संपादक अरूण टिकेकर (६५-६६). सरोजिनी वैद्य : समग्र : प्रारंभ स्वतःपासून हवा! (६६-७०) श्री. पु. भागवत, सांस्कृतिक : खरा प्रश्न जीवनमूल्यांचा! (७०-२), जयंत साळगावकर, धार्मिक, धर्मक्षेत्रातर्हा हिंदीचे आक्रमण (७२). एकनाथ साखळकर : समाजशास्त्रीय : भाषावृद्धीची केंद्रं वाढणं अगत्याचं! (७३-६), रा.रं. बोराडे, संस्थात्मक : मराठीपणा टिकणं आवश्यक! (७६), रवी बापट, वैद्यकीय प्रतिशब्दांचा अट्टहास का? (७७-८), श्रीकांत भट, कायदा : इंग्रजीला तरणोपाय नाही! (७८-९), भरत दाभोळकर, जाहिरात : हवी थोडी स्टाईल! (७९-८०). संकलन व शब्दांकन : अपर्णा पाडगावकर.

२) अकलूजकर विद्युलेखा, 'अठराविश्व दारिद्र्य' साप्ताहिक सकाळ - १६ फेब्रुवारी, २००२, पृ. २६-२७.

३) आयंगार वेंकटेश, 'हिंदी आणि काही इंग्रजी', नवभारत, एप्रिल, २००२, पृ. ४०.

४) औटी शैलेश, राणे सुजाता, 'मुंबईतील अल्पसंख्याक महाविद्यालयांतील मराठीचे

अध्यापन', मैत्रीच्या पलीकडे, जुलै ऑक्टोबर २००२, पृ. १४-१६.
५) अंबाडे गजानन, 'मराठीतून बोलू, मराठी वाचवू', किर्लोस्कर, जानेवारी २००२, पृ. १९-२०
६) कुलकर्णी उदय, 'प्रश्न मराठीचा', रुची, जुलै २००२, पृ. १२ ते १३.
७) कुलकर्णी वंदना, 'भाषा विरूद्ध भाषा - एक प्रतिक्रिया', मिळून साऱ्याजणी, जून २००२, पृ. ११ ते १३.
८) गर्गे स.मा., 'मराठी भाषेचे फ्युचर', किर्लोस्कर, जानेवारी २००२, पृ. ४ ते ७.
९) चतर्जी सुनीतिकुमार, 'इंग्रजी आणि हिंदी', 'नवभारत', एप्रिल २००२, पृ. ३६ ते ४०
१०) जावडेकर प्रकाश, 'मराठी, इंग्रजी व आय.टी., तिन्ही हवे', किर्लोस्कर, जानेवारी २००२, पृ. १५ ते १६.
११) जोशी कैलास, 'मराठी भाषा व साहित्य : अध्यापनातील आव्हान व दिशा', मैत्रीच्या पलीकडे, जुलै ते ऑक्टोबर २००२, पृ. ७ ते १०.
१२) जोशी सुरेश, 'मराठीचे भवितव्य', किर्लोस्कर, जानेवारी २००२, पृ. ८ ते ९ :
१३) टिकेकर अरुण - पहा : मराठी मृतवत् व्हायची नसेल तर....
१४) ठाले - पाटील कौतिकराव, 'एकविसाव्या शतकातील भाषा व समाज', रुची, सप्टेंबर २००२, पृ. १३-१४
१५) ठोसर सारिका, 'बृहन्महाराष्ट्रातील मराठी भाषा व साहित्यासंबंधी समस्या', मैत्रीच्या पलीकडे, जुलै ते ऑक्टोबर २००२, पृ. १७ ते १८.
१६) थोरात हरिश्चंद्र, 'मराठीचा प्रश्न', अनुष्टुभ, जानेवारी ते फेब्रुवारी २००२, पृ. ५ ते १०.
१७) दाभोळकर भरत - पहा : मराठी मृतवत् व्हायची नसेल तर.....
१८) देशपांडे अभिजित, 'जागतिकीकरण आणि आपली मराठी', आपला परममित्र, मे २००२, पृ. ५.
१९) देशमुख सुजाता, 'भाषा विरूद्ध भाषा' (अनु.), मिळून साऱ्याजणी, जून २००२, पृ. ७-११.
२०) देव विजया, 'दुर्गा भागवतांच्या लेखनातील भाषिक वैशिष्ट्ये', ललित - दुर्गा भागवत विशेषांक, ऑगस्ट २००२, पृ. ४३ ते ४८.
२१) धोंगडे दिलीप, 'मराठीचा पारंपरिक अभ्यासक्रम आणि व्यवसायाच्या नव्या दिशा', मैत्रीच्या पलीकडे, जुलै ते ऑक्टोबर २००२, पृ. २७-२८.
२२) परब प्रकाश, 'भाषा-नियोजन आणि मराठी भाषा', अनुष्टुभ. जानेवारी ते फेब्रुवारी २००२, पृ. २९ ते ३४.
२३) परब प्रकाश, 'बदलत्या सांस्कृतिक वास्तवात मराठीच्या अभ्यासक्रमाचे स्वरूप',

मैत्रीच्या पलीकडे, जुलै ते ऑक्टोबर २००२, पृ. १८ ते २२.
२४) पाटणकर वसंत, 'हद्दपारीच्या वाटेवरील मराठी भाषा', अनुष्टुभ, जानेवारी ते फेब्रुवारी २००२, पृ. २२ - २८.
२५) पाटील प्रसन्नकुमार, 'मराठी आजकालची', रुची, सप्टेंबर २००२, पृ. १७ ते २०.
२६) पोतदार द. वा., 'इंग्रजी की हिंदी', नवभारत, एप्रिल २००२, पृ. ३० ते ३६.
२७) बागले प्रभाकर, 'मराठीचे भाषिक भान : स्थितिगती' (संपादकीय), अनुष्टुभ, जानेवारी ते फेब्रुवारी २००२, पृ. १ ते ४.
२८) बापट रवी - पहा : मराठी मृतवत् व्हायची नसेल तर.....
२९) बेरी शोभना, 'मराठी लेखनाचा बागुलबुवा - कारणे आणि उपाय', किर्लोस्कर, जानेवारी २००२, पृ. १३ - १४.
३०) बोराडे रा. रं. - पहा : मराठी मृतवत् व्हायची नसेल तर......
३१) भट श्रीकांत पहा : मराठी मृतवत् व्हायची नसेल तर.....
३२) भडकमकर अं.श्री., 'भाषा की माहितीतंत्रज्ञान', साप्ताहिक सकाळ, १५ जून २००२, पृ. ४५ ते ४७.
३३) भागवत श्री.पु. - पहा : मराठी मृतवत्, व्हायची नसेल तर......
३४) मेहेंदळे विश्वास, 'मराठी जसे (की तसे) आमुची मायबोली', किर्लोस्कर, जानेवारी २००२, पृ. १० ते १२.
३५) मंचरकर रत्नाकर, 'वृथा ही बढाऔ सुकार्याविणे', अनुष्टुभ, जानेवारी ते फेब्रुवारी २००२, पृ. ११ ते १९.
३६) रसाळ सुधीर, 'मराठी भाषा, समाज आणि शासन', अनुष्टुभ, जानेवारी ते फेब्रुवारी २००२, पृ. २० ते २१ व २८.
३७) वरखेडे रमेश ना., 'मराठीचे अभ्यासक्रम : मुक्त विद्यापीठाची भूमिका' मैत्रीच्या पलीकडे, जुलै ते ऑक्टोबर २००२, पृ. ३५-३६.
३८) वीर रामचंद्र, 'सांकेतिक भाषा आणि सांकेतिक लिपी' किर्लोस्कर, जानेवारी २००२, पृ. १७ ते १८.
३९) वैद्य सरोजिनी, 'मराठीचे अध्यापन - सिंहावलोकन', मैत्रीच्या पलीकडे, जुलै ते ऑक्टोबर २००२, पृ. ५ ते ६.
४०) वैद्य सरोजिनी - पहा : मराठी मृतवत् व्हायची नसेल तर.......
४१) शहा मृणालिनी, 'मराठी भाषेचे अध्ययन - अध्यापन : स्वरूप आणि अपेक्षा', मैत्रीच्या पलीकडे, जुलै ते ऑक्टोबर २००२, पृ. २९-३४.
४२) शहा मृणालिनी, 'मराठी भाषा शिक्षणाचे महत्त्व'. महाराष्ट्र साहित्य पत्रिका, जाने.फेब्रु.मार्च २००२.

४३) सानेकर वीणा, 'मराठीच्या अभ्यासक्रमाची पुनर्रचना', मैत्रीच्या पलीकडे, जुलै ते ऑक्टोबर २००२, पृ. ११ ते १३.

४४) साखळकर एकनाथ - पहा : मराठी मृतवत् व्हायची......

४५) साळगावकर जयंत - पहा : मराठी मृतवत् व्हायची.......

४६) सोमण श्रद्धा सं., 'मराठी भाषेचे अध्ययन - अध्यापन : स्वरूप आणि अपेक्षा', मैत्रीच्या पलीकडे, जुलै ते ऑक्टोबर २००२, पृ. २४ ते २६.

- **दैनिकातील लेख :**

१) अयाचित स.गो., 'भाषेतील कालिक, दैशिक बदल या विचारात गोंधळ नको', सकाळ (दीर्घ पत्र - वाचकांचा पत्रव्यवहार सदर), ४ जानेवारी २००२, पृ. ४.

२) कुलकर्णी महेश, 'व्यावसायिक यशासाठी इंग्रजी हवी, हा गैरसमज', सकाळ, ९ एप्रिल २००२, पृ. ४.

३) गुंडी नीलिमा, 'भाषेचे भाष्यकार', रविवार सकाळ, २८ एप्रिल २००२, सप्तरंग पुरवणी, पृ. २.

४) गेंगजे किरण, 'मराठीला आधी हिंदीपासून वाचवा', सकाळ (दीर्घपत्र - वा.प.) ३१ जानेवारी २००२, पृ. ४.

५) गोडसे शरद, 'माय मरो नि मावशी जगो', सकाळ (दीर्घपत्र - वा.प.), ९ फेब्रुवारी २००२, पृ. ४.

६) चपळगावकर नरेंद्र, 'शिक्षणासाठी मराठी माध्यम', रविवार सकाळ, सप्तरंग पुरवणी, २२ सप्टेंबर २००२, पृ. २.

७) चौगुले जयदास, 'मराठीला आपण समर्थ शब्द देणार आहोत का?' सकाळ (दीर्घ पत्र-वाचकांचा पत्रव्यवहार), २९ जानेवारी २००२, पृ. ४.

८) जोगळेकर गं.दि., 'मराठी विषयीचे महत्त्वाचे प्रश्न व साहित्य संस्था', सकाळ (दीर्घ पत्र - वा.प.), ३ जानेवारी २००२, पृ. ४.

९) पुरोहित के.ज., 'वऱ्हाडी बोली ही प्रमाण मराठीची बोलीभाषा नव्हे, ती मराठीच्या अनेक बोलभाषांपैकी एक आहे' - लेखांक - १, लोकमत, अक्षररंग पुरवणी, २४ मार्च २००२, पृ. २.

१०) पुरोहित के.ज., 'वऱ्हाडी बोली ही प्रमाण मराठीची बोलीभाषा नव्हे, ती मराठीच्या अनेक बोलभाषांपैकी एक आहे' - लेखांक - २, लोकमत, अक्षररंग पुरवणी, ३१ मार्च २००२, पृ. २.

११) बनहट्टी राजेंद्र, 'मराठी भाषा अजरामरच राहणार' (सा.सं. अध्यक्षीय भाषणाचा गोषवारा), सकाळ, १९ जानेवारी २००२, पृ. ३.

१२) बिर्नीवाले अविनाश, 'शब्दांचे कूळ आणि मूळ', लोकमत, मंथन पुरवणी, १३ ऑक्टोबर २००२, पृ. ६.

१३) रत्नपारखी उल्हास, 'शब्द एक, अर्थ अनेक', महाराष्ट्र टाइम्स, संवाद पुरवणी, १३ ऑक्टोबर २००२, पृ. २.
१४) राजगुरू माधव, 'अचूक आणि शुद्ध लेखन दुर्मिळ का व्हावे', लोकमत, १७ मार्च २००२, पृ. ५.
१५) रायचूर रा.श्री., 'सीमा भागातील मराठी भाषक कन्नड का नाही शिकत', (दीर्घ पत्र - वा.प.), सकाळ, ३१ जानेवारी २००२, पृ. ४.
१६) वाघ विठ्ठल, 'नव्या म्हणी', सकाळ, सप्तरंग पुरवणी, ६ जानेवारी २००२, पृ. ११.
१७) वालावलकर य.ना., 'मराठी भाषेचे संवर्धन करण्यासाठी', सकाळ (दीर्घ पत्र - वा.प.स.), ९ फेब्रुवारी २००२, पृ. ४.
१८) साठे दिलीप, 'मराठी मातृभाषेचा किती अभिमान असावा', सकाळ (दीर्घ पत्र - वा.प.स.), २९ जानेवारी २००२, पृ. ४.

■

**मराठी - विभाग, एस्.पी. कॉलेज, पुणे.**

## परिषदवार्ता

१. मैसूर येथील 'भारतीय भाषासंस्थान' [Central Institute of Indian Languages, Ministry of Human Resource Development, Department of Secondary and Higher Education, Government of India] तर्फे 'भाषा आणि जीवन' या नियतकालिकाला २००३ या वर्षासाठी दहा हजार रुपयांचे अनुदान मिळाले आहे.

२. मराठी अभ्यास परिषदेची विशेष साधारण सभा दि. ९.२.०३ ला भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे येथे सकाळी १० वाजता आयोजित केली होती. त्या सभेत परिषदेची दुरूस्त घटना सुचविलेल्या आणि स्वीकारलेल्या दुरूस्त्यांसकट संमत करण्यात येत असल्याचा ठराव सर्वानुमते मंजूर करण्यात आला.

■



अनुक्रमणिका

१. **'मराठी अभ्यास परिषद पत्रिका : भाषा आणि जीवन'ची वर्गणी :**

वर्गणी भरण्यासाठी पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असे आहे. या त्रैमासिकाचे वर्षात चार अंक निघतात. १ जानेवारी, २००२ पासून वर्गणीचे दर पुढीलप्रमाणे आहेत.

वार्षिक वर्गणी - संस्थेला रु. १२५ फक्त, पंचवार्षिक वर्गणी रु. ५५० फक्त
व्यक्तीला रु. १०० फक्त, पंचवार्षिक वर्गणी रु. ४५० फक्त

२. **आजीव वर्गणी :**

मराठी अभ्यास परिषदेची आजीव सदस्यत्व वर्गणी रु. १०००/-. पूर्वीच्या आजीव सदस्यांनी वर्गणीतील वाढीव रक्कम रु. ४००/- भरावी, असे परिषदेतर्फे आवाहन आहे.

३. **पैसे भरण्याबद्दल सूचना :**

वर्गणी प्रत्यक्ष रोखीने किंवा धनादेशाने देता येईल. **कृपया मनिऑर्डर पाठवू नये.** धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत ५ रुपये वटणावळ अधिक घालावी. धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे. पावती दिली जाईल. नमुना अंक मिळाला असल्यास कोणता अंक याचा उल्लेख करावा.

**वर्गणी व तत्संबंधी पत्रव्यवहाराचा पत्ता :** नीलिमा गुंडी, ३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५, वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११ ००२. दू. क्र. ४४८६०१५

३. **मागील अंक :**

'भाषा आणि जीवन' हे त्रैमासिक १९८३ पासून प्रसिद्ध होत आहे. (१९८३ या वर्षी मात्र दोनच अंक निघाले आहेत.) काही अंकांचा अपवाद वगळता सर्व वर्षांचे अंक उपलब्ध आहेत. १९८३ ते १९९० पर्यंतच्या प्रत्येक अंकाची किंमत रु. १०/-, १९९१ पासून पुढील वर्षातील प्रत्येक सुट्या अंकाची किंमत रु. २०/- आणि २००२ पासून प्रत्येक सुट्या अंकाची किंमत रु. २५/-.

५. **प्रकाशने :**

या त्रैमासिकातील निवडक लेखांचे संपादित पुस्तक 'निवडक भाषा आणि जीवन' (किंमत रु. २००) परिषदेच्या कार्यवाहांकडे अथवा मेहता पब्लिशिंग हाउसमध्ये मिळू शकेल. तसेच 'भाषांतरमीमांसा' हे पुस्तकही कार्यवाहांकडे अथवा प्रतिमा प्रकाशनाकडे उपलब्ध आहे.

६. **जाहिरातीसाठी दर :**

पूर्ण पान रु. ७५०/- , अर्धेपान रु. ४००/-, पाव पान रु. २५०/-, शुभेच्छा सूचना रु. १००/-, आवरण पृष्ठ तीन / चार रु. ८००/- जाहिरात मराठीत असल्यास उत्तम, हिंदीत, इंग्रजीत असल्यास चालेल.

